# नजराणा

## कवितासंग्रह

वा. ज्यो. देशपांडे




१९५०

किंमत दोन रुपये

रविकिरण मंडळास

सादर समर्पण

मावळतीवर रविकिरणें सतेज सुंदर शांत:
दिनभर देउन प्रकाश जगता,
कर्तव्याची करुन सांगता,
समाधान पावून पाहती शोभा कीं सीमान्त.
कणाकणांतुन स्फुरलें जीवन,
कलाकलांनीं अवघें नटवुन,
शिल्पकार कीं निजमूर्तीला पाही आज निवान्त.
प्राशुन त्यांची तेजोमाया,
ग्रहगोलादी आले उदया,
आतां नाहीं चिन्ता कांहीं उरेल भंवतीं ध्वान्त.
त्या किरणांना हा नजराणा,
हेतु परंतु लोभसवाणा,
नव ताऱ्यांना हवा मिळाया प्रकाश कीं निभ्रान्त.

—वा. ज्यो. देशपांडे

# श्री. वा. ज्यो. देशपांडे यांची कविता

जीवनांतील सुखदुःखांनीं मनांत उठणाऱ्या मंदमधुर हेलकाव्यांचे हे आलेख होत असें कोणीहि म्हणावें अशाच ह्या कविता आहेत. उगाच मोठा आव नाहीं पण भाव मात्र निरामय आहे. गिरीशांच्या गुरूपदेशानें भारलेली–जोपासलेली आणि रविकिरण मंडळाच्या संस्कारांनीं मोहरलेली ही कविता असल्यामुळें 'नव–काव्य' म्हणून आज जी कविता ओळखली जाते तिचा वाराहि ह्या कवितेला चालणार नाहीं. आघातांनीं विकल झालेल्या स्वतःच्या हळव्या मनाला—

**जेथें आवस आज भासत तुला, अंधार वा भोंवतीं**
**तेथें येइल चांदणें अनुभवा, हासेल राकापती**

धीर देणारे हे काव्योद्गार त्यांच्याप्रमाणेंच वाचकालाहि धीर देतील; जीं मूल्यें कविमनाला मान्य आहेत त्यांचे संबंधांतील—

**अंतर्बाह्य मनांत एकच असो सद्भावना निर्मल**
**ओठीं अमृत तें नसो, पण नको पोटांत हालाहल.**

ही किमान अपेक्षा कोणालाहि आपलीशी वाटेल. आणि—

**असाच पुढतीं प्रहार झेलित**
**असेंच पुढती कडुवच साहित**
**ध्येयामागें धावित वणवण**
**प्रभो, धैर्य दे, धैर्याविण ना लागे येथ टिकाव**

ह्या त्यांच्या सुरांत कोणीहि आपला सूर मिळवील.

ता. ५–५–५०

"यशवन्त" दिनकर पेण्ढरकर

# आच्छादन

हा ' नजराणा ' तयार करणारे कवि श्री. वा. ज्यो. देशपांडे हे माझे विद्यार्थि-मित्र आहेत. त्यांचें विद्यार्थिदशेपासूनचें स्वावलंबी, कष्टमय व बाणेदार जीवन मीं जवळून अनेक वेळां पाहिलें आहे. वाईट परिस्थितीमुळें त्यांच्या आशाआकांक्षांचे व कर्तृत्वाचे मोड कसे दडपले गेले आहेत, तें मीं पाहिलें आहे. त्यांच्या रसिक वृत्तीशीं व काव्यात्म प्रवृत्तीशीं माझा उत्तम परिचय आहे, आणि त्यांच्या उदार व उत्साही गृहजीवनानें मला अनेक वेळां प्रसन्नता दिलेली आहे. पण या सर्वांपेक्षां त्यांचा विशेष म्हणजे ते अबोल कार्यकर्ते आहेत. बी. ए. ला तर्खडकर सुवर्णपदक मिळवूनहि ते जन्नरसारख्या एका बाजूच्या खेड्यांत आपलें शिक्षकाचें जीवन मोठ्या हौशीनें व समाधानानें घालवीत आहेत; आणि घरच्या आपुलकींत व शाळेंतील निष्ठेंत तन्मय झाल्यावर किंवा शिवनेरीच्या प्रसन्न परिसरांत अंतःकरणांत ऊर्मि दाटून येतांच त्यांनीं बद्धपरिकर होऊन लेखणी उचलेली आहे. त्यांनीं आपल्या कविता कितीतरी दिवस अप्रसिद्धच ठेवल्या होत्या याला कारण त्यांचा प्रसिद्धिविन्मुख स्वभावच व कविता लिहिल्यावर ती मुरूं देण्याची नैसर्गिक प्रवृत्तिच होय. संस्कृत व मराठी साहित्यशास्त्रांच्या गाढ्या अध्ययनानें त्यांच्या मनावर जे कांहीं उत्तम संस्कार केले आहेत त्यांतलाच हा एक आहे. शिवाय आधुनिक कविता व तीमधील कला यांचा त्यांनीं सखोल अभ्यास केलेला आहे. अशा काव्यसाधकाचा योग्य वेळीं रसिकांना परिचय करून देणें हें घरच्याच वडीलधाऱ्या मंडळींचें काम आहे. मुलगा कर्तासवरता झाला म्हणजे आपण त्याची चार मोठ्या लोकांत प्रसंगोपात्त ओळख करून देतोंच कीं नाहीं? तसेंच हें नजराण्याच्या अनावरणाचें काम आहे.

श्री. देशपांडे यांच्या गत जीवनानें त्यांना भोंवतालीं सूक्ष्मपणें पाहाव-

यास लावलें आहे व त्यांच्या व्यासंगानें त्यांच्या मनांत जीवनविषयक व काव्यविषयक कांहीं मूल्यें निर्माण केलीं आहेत. त्यांनीं केशवसुता-पासूनच्या कवींचा व विशेषतः 'रविकिरणमंडळांतील' कवींचा सूक्ष्म अभ्यास केला आहे, आणि त्यामुळें त्यांच्या कवितेवर त्या त्या कवींची छाया पडल्याखेरीज राहिली नाहीं. 'हिरा आणि कोंदण आपलें', पण त्याची घडण वा पद्धत दुसऱ्याची, असें त्यांचें कवितालेखनाच्या बाबतींत झालें आहे. आणि हें ते स्वाभिमानानें व प्रामाणिकपणानें सांगतातहि. या त्यांच्या प्रांजळपणाबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत. परंतु हा प्रश्न गौण म्हणून सोडून दिला, तरी 'रविकिरणानें'हि आपलें म्हणून कांहीं वैशिष्ट्य निर्माण केलें व त्याचे पडसाद समकालीनांच्या व पुढील पिढीच्या कवितेंत उठले हें सत्य आहे. त्याचें तात्त्विक व ऐतिहासिक दृष्ट्या थोडें समालोचन केल्यास तें 'नजराण्याचें' स्वरूप समजण्यास पोषकच होईल.

गोविंदाग्रजांच्या मृत्यूपर्यंतची आधुनिक मराठी कविता पाहिली व त्यानंतरची कविता पाहिली कीं त्यांत कांहीं निराळेपणा दिसल्याखेरीज राहात नाहीं. याबाबत अजून कांहीं मतभेद आहेत. कांहींच्या मतें केशव-सुती कवितेचें तें 'विस्तरण व व्यवस्थापन' आहे, तर कांहींच्या मतें तें संपूर्ण अनुकरणच आहे. अर्थात् या विषयावर निर्णायक मत देण्याचा अधिकार माझा नाहीं; पण मला नम्रपणें असें वाटतें कीं 'केशवसुती' 'गोविंदाग्रजी' किंवा 'रविकिरणी' युगांतले कांहीं थोडे विषय व कांहीं थोड्या प्रवृत्ति या एकविध असल्या तरी त्यांचा गाभा, तो सजविण्याची पद्धत, त्याचें वृत्त, त्यांतील कला किंवा विचार ध्वनित करण्याचे मार्ग हीं मुळाचें केवळ 'विस्तरण वा व्यवस्थापन' नाहींत सूर्य अस्ताला गेल्यावरहि त्याच्या छटा मावळतीवर रेंगाळत असतात; किंवा सूर्यापासूनच चंद्राला तेज मिळतें म्हणून कांहीं सूर्याचें व चंद्राचें कार्य एकच आहे किंवा चांदणें हें सूर्यकिरणांचें विस्तरण व व्यवस्थापन आहे असें आपण म्हणत नाहीं. त्याचप्रमाणें केशव-सुत, गोविंदाग्रज किंवा 'रविकिरण' यांचे चेहरेमोहरे जरी एकसारखे दिसले तरी त्या प्रत्येकाचें स्वरूप वेगळें आहे हें सूक्ष्म अभ्यासकाच्या ध्यानीं येईल. अंतर्गाभ्याचा प्रश्न निकालांत काढण्यासारखी वेळ अजून आलेली

नाहीं; त्यामुळें त्यावर सध्या अधिक चर्चा करणें अप्रस्तुत व धाडसाचें होईल. परंतु रविकिरणांतील कवि सौंदर्यवादी ( *Romantic* ) निश्चित होते व आहेत एवढें म्हटल्यास तें असत्य खास नाहीं.

याबरोबरच काव्यात्मक किंवा सौंदर्यवादी कवींच्या सर्व प्रवृत्ति त्यांच्या काव्यांत दिसतील; मात्र थोडी तत्कालीन समाजास्थिति लक्षांत घेऊन ऐतिहासिक प्रवृत्तीनें त्यांकडे पाहिलें पाहिजे. रविकिरणमंडळाचा उदय पहिल्या महायुद्धानंतर झाला असला तरी महायुद्धाची खरी झळ आपल्या देशाला प्रत्यक्ष तितकीशी लागलीच नव्हती हें लक्षांत घेतलें पाहिजे. इंग्रजशाहीनें घालून दिलेल्या चाकोरींतून आपला देश चालला होता; व त्याच्या पुढें रानडे–टिळकांचीं सामाजिक व राजकीय ध्येयें हीं अजूनहि ध्येयस्वरूपांतच वावरत होतीं. पुढें येणारें 'गांधीयुग' नुकतेंच सुरू झालें होतें, पण त्यानें मनाची सर्वस्वीं पकड घेतली नव्हती. त्याबाबत सामाजिक मनहि अजून अश्रद्धच होतें. 'दुसऱ्या महायुद्धानें जीवनाची सर्वस्वीं धुळधाण उडविली जाईल' याची अंधुक देखील कल्पना त्यावेळीं कुणाला नव्हती. अशा वेळीं समाजाच्या अंतर्जीवनाकडे व त्यांतील सौंदर्यवादाकडे कवींचें लक्ष जाणें साहजिक होतें. साहजिकच सौभाग्य, प्रेमविवाह, गतयुगांतील गोष्टींचें विडंबन, विधवांचे प्रश्न, शेतकरीविषयक प्रश्न, राजकीय आंदोलनें, जीवनांतील बारीकसारीक त्याग, किंवा संसारसंगीत याकडे कवींचें लक्ष गेलें. गज्जल–जाती–छंदांतून म्हणजे प्रचलित वृत्तापेक्षां निराळ्या व नवीन वृत्तांतून कविता लिहिली गेली. त्यांचे यशस्वी प्रयोग झाले; भावगीताला व खंडकाव्याला रेखीव व कलात्मक स्वरूप देण्यांत येऊं लागलें. उपमा-दृष्टांतादि अलंकाराच्या व रंगदृष्टीच्या बाबत शास्त्रीय दृष्टीच्या शुद्धाशुद्धतेची कदर वाटूं लागली; भाषेला सफाईदारपणा व प्रसन्नता आली; छोट्या छोट्या कथा काव्याच्या रूपानें समाजजीवनांतील स्वभावरेखाटन होऊं लागलें व काव्यगायनानें आधुनिक कविता समाजाच्या वरच्या व खालच्या अनेक थरांपर्यंत पोचविण्यांत आली. ही झालेली प्रगति किंवा हे झालेले संस्कार अमान्य करणें कठिण जाईल. आणखी थोडें सूक्ष्मांत गेलें तर असेंहि म्हणतां येईल कीं केशवसुत, गोविंदाग्रज व माधव जूलियन्,

यशवंत यांनीं घडविलेलीं प्रेमाचीं दर्शनें एकाच सांच्याचीं: निश्चित नव्हतीं. मग ' विस्तरण व व्यवस्थापन ' कशाचें केलें? या सर्व कवींच्या प्रेमविषयक दृष्टिकोनांत कितीतरी फरक होता; आणि तो तसा होता म्हणूनच ' विरह-तरंग ' हें ' मेघदूतापेक्षां श्रेष्ठ काव्य आहे, असं म्हणण्याचें धाडस ' कांहीं टीकाकारांनीं केलें. जें प्रेमविषयक दृष्टिकोनाच्या बाबतींत तेंच राष्ट्रीय वा सामाजिक दृष्टिकोनाच्या बाबतींतील म्हणतां येईल. केवळ आज त्या किंवा उद्यांच्या युगाची त्यांत दृष्टि नाहीं किंवा नव्हती (?) म्हणून तत्कालीन युगांत ते नवीन क्षितिजें शोधीत नव्हतेच, हें म्हणणें ऐतिहासिक दृष्ट्या चुकीचें ठरेल. मला तर असें वाटतें कीं ' रविकिरणी ' कविता हा ' केशवसुती कविता ' व ' नव्य कविता ' ( क्रांति–रसाची कविता ) यांच्या मधला योग्य असा दुवा आहे. त्यांना ' सामान्यांचे सामान्य उद्गार ' म्हणणें म्हणजे सत्याचा अपलाप आहे.

' रविकिरणी ' कवितेचें हें सर्वसामान्य स्थूल स्वरूप लक्षांत घेतलें, म्हणजे त्या काळांत व त्यावेळच्या ' मंचर ' ( *Romantic* ) वातावरणांत वावरणाऱ्या श्री. देशपांडे यांच्यासारख्या संस्कारक्षम तरुण विद्यार्थ्यांवर तिनें छाप बसविली असल्यास नवल नाहीं. त्यावेळच्या कितीतरी तरुणांनीं त्या त्या प्रवृत्तींचें अनुकरण केलें आहे. हें करणें बरें कीं वाईट. हा निराळा प्रश्न आहे, आणि तो सर्व काळीं सर्व अनुकरणांना सारखाच लागू होईल. याचा अर्थ या अनुकरणांतील प्रत्येक भाग चांगला व समर्थनीय असतो असाहि नाहीं फक्त श्री. देशपांडे आपल्या कवितेचें गोत कोणतें सांगतात तें ध्यानांत येण्यासाठींच हा एवढा प्रपंच केला. यांत आत्मकर्तृत्वाची प्रशंसा नाहीं किंवा आभिनिवेश वा समर्थनाहि नाहीं हें नम्रपणें सांगावेसें वाटतें.

श्री. देशपांडे यांच्या मनावर मराठीपेक्षां संस्कृत साहित्याचे व साहित्य शास्त्राच विशेष संस्कार झाले आहेत हें त्यांच्या भाषेवरून, मांडणीवरून किंवा शैलीवरून लक्षांत येण्याजोगें आहे. ते संस्कृतच्या पकडींतून सुटले असते तर अधिक बरें झालें असतें. मनाच्या पार्श्वभूमींत संस्कृताचें भांडार जरूर असावें, पण कवितेनें शब्दस्वरूपांत अवतरतांना निव्वळ मराठी

संस्कार घेऊन अवतरावे हेंच उत्तम. पण मतभेदाची ही बाब घटकाभर सोडली तर श्री. देशपांडे यांच्या कवितांतील कांहीं विशेष पाहाण्यासारखे आहेत. कवितादेवीला आळवितांना ते 'मानवतेचीं गाणीं गाण्याची इच्छा धरतात, जिवंत वाणीची मागणी करतात व अन्यायाच्या दर्शनानें त्वेषाला उधाण येवो असें म्हणतात. दिवंगताच्या अतृप्त आशा आपण पूर्ण केल्या पाहिजेत असें त्यांस निश्चित वाटतें. त्याचप्रमाणें नव्या युगाची नवीन दृष्टि मिळावी इतकेंच काय पण त्याला योग्य अशी नवी सृष्टि घडविणारा ब्रह्मदेवहि पण नवीन असावा अशी त्यांची मागणी आहे.' शारदेजवळ मागितलेल्या या वरदानाच्या धोरणानें त्यांची कविता वाचली म्हणजे तीमधील रहस्य ध्यानीं येईल.

जीवनविषयक कवितांत एकाकीपण, हळवें मन, कोंडमारा, सणवार, संसारतापानळ, मृत्यू किंवा आईचें हृदय हे विषय त्यांनीं आत्मीयतेनें हाताळले आहेत. यांत संसाराचा मार्ग एकटाच खोदित जाणाऱ्या संसारी शिल्पकाराचें दर्शन आपणांस घडतें. यांतील सुखदुःखांचा धनी तोच कसा असतो व स्वतःला धीर देणाराही तोच कसा असतो हें दिसून येतें. परंतु अशा जीवनाला 'पतंगा'सारखीं किंवा 'सायंतान्या' सारखीं मनोहर दृश्यें ध्येयदर्शन घडवितात व त्यांतूनच त्यांच्या मनःपिंडाचा विकास होतो असें दिसतें.

श्री. देशपांडे हे प्रामुख्यानें आत्मनिष्ठ कवि आहेत, आणि त्यांच्या अंतर्मनांत 'प्रेम' भावनेला फार महत्त्वाचें स्थान आहे. त्यांचीं प्रेमगीतें बहुतेक 'आळवणी' किंवा 'विरहगीतां'च्या स्वरूपाचीं आहेत. जीवन सफल किंवा सौंदर्यपूर्ण करण्यासाठीं त्यांना कांहीं आंतरिक ओढ आहे व ती ओढ त्यांना सौंदर्यजीवनाचे व प्रेमाचे जे अनुभव देते त्यांचीं प्रतिबिंबें त्यांच्या प्रेमविषयक कवितेंत पडतात. त्यांत त्यांना श्रेय दिसतें, आशेबरोबर चाललेला लपंडाव दिसतो, गृहप्रवेश दिसतो, क्षमा मागणारी प्रिया दिसते, क्षीणकाय आशा 'आशातंतुः सहागाति' यासारखी दिसते, तिची दारांत चाहूल ऐकूं येते व 'प्रीति' व 'स्नेह' यांतील अंतर समजल्यावर नुसत्या 'स्नेहानें' त्यांचें मन अस्वस्थहि होतें. त्यांची प्रीतीची भावना पतंगाच्या जातीची

आत्माहुतीची आहे; तिला आपलें प्रेय दारांत उभें असलेलें दिसतें व ओळख झाल्यावर ती त्याला नेत्रांनीं ओवाळते, त्याची चांदण्यांत भेट घेते व आपले भाव ती खुले करते, क्वचित् एकांतांत हुंदकेहि देते. सारांश, अप्राप्य किंवा दुष्प्राप्य प्रेयाच्या तीव्र ओढीमुळें जीवनांत उत्पन्न होणारे अनेक प्रकारचे हेलकावे त्यांच्या काव्यांत चित्रित झाले आहेत.

प्रेमविषयक कवितांत त्यांचीं कांहीं नाट्यगीतें या नजराण्यांत संग्राहित झालेलीं आहेत. त्यांत 'मुद्रिका', 'समर्थन' व 'सीतामंगल' हीं उत्कृष्ट आहेत. 'मुद्रिकेंतील अभिजात सौंदर्य,' 'समर्थनां'तील संस्कृत धाटणी व 'सीतामंगल' मधील अधीर भावकोमलता हीं विशेष उल्लेखनीय आहेत.

समाजजीवनाविषयक कवितांत 'दीपावली', 'लक्ष्मीपूजन' व विशेषतः 'नौखाली' या कविता आकर्षक असून त्या आपल्यापुढें आपली दुर्दशा साक्षात् उभी करतात. स्वातंत्र्य आलें पण 'स्नेह, सुस्थिति व समता' यांचा ठावठिकाणाहि नाहीं असें 'दीपावली' जाहीर करते, तर कोणच्याहि सद्यःकालीन समारंभांत फाजील औपचारिकपणा आहे हें 'लक्ष्मीपूजन' सांगतें ? आणि 'नौखाली' तर आपलें हृदय फाडून आपलें रौद्र व भयानक चित्र पुढें उभें करतें. 'पदसेवा' या कवितेंतील 'शहरी संस्कार खेड्यास पोषक नाहींत' हा विचार लक्षांत ठेवण्याची वेळ आली आहे असें वाटतें. याखेरीज 'संक्रांत', 'सोन्याची लंका', 'श्रमदेव' या कवितांतील चित्रण स्वतंत्र भारतांतील लोकांना उद्‌बोधक वाटेल असें आहे. या कवितांच्या जोडीला कांहीं 'बाळगीतें' व एकुलतें एक भाषांतर आहे. वर्डस्वर्थच्या 'सॉलिटरी रीपर'चें हें भाषांतर गज्जल वृत्तांत फार समर्पक वाटतें.

श्री. देशपांडे हे एक निष्ठावंत कवि आहेत, आणि याच निष्ठेनें त्यांनीं आपलें हें पुस्तक रविकिरणमंडळास अर्पण केललें आहे. डोळस श्रद्धेची चण-चण भासणाऱ्या कालांत ही वृत्ति स्वागतार्ह वाटते.

या 'नजराण्यांत' अनेक काव्यप्रकार व वृत्तप्रकार आले असून ते सर्व श्री. देशपांडे यांनीं सफाईदारपणें हाताळले आहेत. श्री. देशपांडे यांचे

विषय ‘ गोविंदाग्रज ’ कालांतील ‘ प्रेम आणि मरण ’ ( ‘ विजेचा खांब ’ ही कविता पाहा ) पासून चालू कालांतील ‘ महात्माजींच्या मृत्यु ’ पर्यंतच्या विविध अवस्था दाखविणारे आहेत. उद्यांच्या नवीन कवितेची ही पूर्व तयारीच आहे. त्यांची प्रतिभा नव्या युगाचीं गीतें नवीनपणानें गाऊन आपला पुढील ‘ नजराणा ’ तयार करील असा विश्वास वाटतो.

या नजराण्यांत श्री. देशपांडे यांनीं अनेक प्रकारचे देशी विदेशी जवाहिरी खडे गोळा केले आहेत. यांत चुकून कांहीं नकली खडेहि गेले असण्याचा संभव आहे. पण ही स्वतंत्र भारताच्या दरबारांतील श्री. देशपांडे यांची पहिलीच भेट आहे. यापुढील नजराण्याच्या ताटांत सर्वच अस्सल हिरे माणकें ते ठेवतील एवढा निर्वाळा या भेटींतून मिळतो एवढें सांगून, रसिकापुढें श्री. देशपांडे यांनीं अत्यंत प्रेमानें ठेवलेल्या या ‘ नजराण्या ’ वरील हें ‘ आच्छादन ’ मी दूर करतों.

८ मे १९५०
विश्रामबाग, सांगली

**शंकर केशव कानेटकर**
( गिरीश ).

# निवेदन

१९३५ पासून काव्यलेखनास सुरवात केली. त्यांतून कांहीं भावगीतें निवडून हा 'नजराणा' सादर करीत आहें.

महाविद्यालयीन अभ्यासाच्या वेळीं कवि गिरीश यांचा प्राध्यापक या नात्यानें परिचय झाला; आणि त्यांनीं आपुलकीनें कौतुक व रसिकतेनें मार्गदर्शन केलें. प्रस्तावनेसाठीं मीं त्यांच्याकडे धांव घेतली ती यामुळेंच. राजकवींचा आशीर्वाद तर—"इच्छावें तें जवळीं आलें." उभयांबद्दल कृतज्ञता कशी व्यक्त करावी ?

माझे मित्र श्री. अनंतराव कुलकर्णी यांच्या परिश्रमाचें हें फळ आहे. जुन्नरसारख्या दूरस्थ गांवाहून प्रकाशनाचा योग साधला, आणि तोही नीटनेटका, हें त्यांच्या साह्यावांचून अशक्य होतें.

आर्यभूषण छापखान्याचे सुंदर छपाईबद्दल आभार मानावें तेवढे अपुरेच होतील. मराठी रसिकांना नजराण्यांतील खड्यांचें पाणी आणि पैलू आवडतील अशी आशा आहे.

जुन्नर १०-५-५० वा. ज्यो. देशपांडे

# १ नजराणा

कविराजांना राजकवींना,
माझा हा नजराणा.

पाणपोइचे थेंब ठिबकले
प्राशुन ते ते मम मन धालें
नवीन कावड नव पोईला
घेउन आलों करीं जिवाला
सेवाभाव दिवाणा.

जेथें ओतिन माझी कावड
रांजण तो तर ओबडधोबड
शिल्प नसे, पण जीवन भरलें
सेवनीय का जविन असलें
गमेल रसलुब्धांना ?

मल्हारांतिल तान घेउनी
तानसेन जो गाइ रागिणी
माधुर्याची खाण मूर्त ती,
वेडें होउन त्याच्या पुढती
गावा काय तराणा ?

वस्तुजात हें जयें नटविलें
अपुल्या तेजें पद भूषविलें
तेथें माझी मिणमिण पणती
संनिध राहुन देइल का ती
शोभा "रवि-किरणांना ?"

शबरीचीं पण बोरें उष्टीं
अल्प न होतां मनांत कष्टी
द्रोणामधल्या रानफळांनीं
तुष्ट होतसे भाव जाणुनी
साकेताचा राणा.

## २ शारदे

( जाति कोकिळा )

हवें तुझें वरदान, शारदे, हवें तुझें वरदान.
मानवतेचीं गावीं गाणीं,
अशी अम्हां दे जिवंत वाणी,
अन्यायाचें दर्शन होतां उसळो त्वेष उधान.

स्वतंत्र भारत-भूचें वैभव
सामर्थ्यानें नटलेलें नव
उच्छासाचा प्रबंध व्हावा, गातां भारतगान.

मराठियेचे नगरीं आम्ही
शिल्पकार कीं रचना-प्रेमी,
जीवन-मंदिर उभरूं सुंदर हा अमुचा अभिमान.

उकलायाला जीवन-शास्त्रें,
पहावया नव विक्रमक्षेत्रें,
दिव्य दृष्टि दे करावयाला उन्नत जीवन-मान.

दिवंगताच्या अतृप्त आशा,
पूर्ण कराव्या अशी मनीषा,
भीष्मकामना निवावया दे अर्जुनशरसंधान.

जशी द्रौपदी यजन-संभवा
यजन-संभवा सीतेसम वा
उज्ज्वल प्रतिभा देइ कराया जीवन यज्ञसमान.

नव्या युगाची नवीन सृष्टि
नव्या मानवा दे नव दृष्टि !
हवा शारदे, नवा विरंची नव-चातुर्य-निधान.

## ३ गुरुवंदन

( सुनीत )

संसारांतिल आर्तगी मजहुनी आधींच तूं ऐकली,
दुःखार्तास सहानुभूति वितरे वाणी तुझी प्रेमळ,
तैसें मत्सरशून्य जीवन तुझें, चारित्र्यही निर्मळ,
ज्याचा मोह पडून सादर तुझीं मीं पाउलें वंदिलीं.
आशा मावळली, मलूल सुमनें खालीं गळूं लागलीं,
'जीवा काय हवे' कळे न मजला, झाला मनीं व्याकुळ,
माझें व्यक्त करीन अंतर जया संवेदना-संकुल,
नाहीं संगत कोणही जन असे, मैत्री नसे राहिली.
ग्रंथांतील तुझ्या रसाळ वचनें—सूक्तेंच किंवा नवीं
कर्तव्यांतिल थोरवी पटविती देती मना सांत्वन,
साक्षात् भाषण ऐकण्यास म्हणुनी होतों सदा उन्मन,
मी येतां तुझिया प्रसन्न सदना प्रीती जिवा जागवी.
कांहीं लोक तुझ्यासमान जगतीं आहेत कीं ज्यामुळें
वाटे जीवन सह्य, धीर मिळतो, आशा मनाची फुले.

## ४ मधुर काव्यसंभार

( जाति-कोकिळा )

मधुर काव्यसंभार कलामय मधुर काव्यसंभार
हिमालयांतुन जणुं गंगोत्री
वाहत आली प्रयाग क्षेत्रीं
सुखवित चाले भरत-धरित्री
कांचनगंगेपासुन घेउन जीवन अपरंपार.

कृष्णेची तूं जीवन-घनता,
मूर्तिमंत तूं सांसारिकता,
कमलाहुनही अंतर-मृदुता,
नसे विकलता मृदुल अंतरीं, वृत्ती तव झुंझार.

जानपदाची निर्मल माया
प्रमादपरता, शीतल छाया
सह्याद्रीसम कणखर काया
बहरे मोहर आंबराईतुन, रसाळ अन् फलभार.

नगराजाची तुंग भव्यता
मानसमेघीं रम्याद्भुतता
विशेष भासे तव कल्पकता
जरी न नवथर यक्षभूमिचा उन्मादी शिणगार.

बालजनांचा राग अनागस
बोल बोबडे, लीला लोभस
हळूच दावुन उकलुन मानस
गोकुळांतल्या गोपसख्याचा घडला साक्षात्कार.

शबल भावना दूर सारतां
आत्मनिष्ठता कलेंत लपतां
अंतरस्पर्शी रचसी कविता
व्यापक, संयत, विशुद्ध विलसे प्रतिभेचा संसार.

अपूर्व दावुन कलाचातुरी
जीवन-पुष्पें वेचुन सारीं
समर्पणाचा भाव अंतरीं
संस्कृतिसूत्रांतून ओविला उदात्त कविताहार

प्रसन्नतेनें, शीतलतेनें
ओपी सकला शांत चांदणें
निवावयाला आंतर नयनें
कलापते तव ' शशिलेखेचा ' दाक्षिण्य आविष्कार.

## ५ जीवन

( सुनीत )

अश्रू गाळित एक ओळ लिहुनी तेथेंच थांबायचें,
तें तें वाचुन पाहुनी परतुनी निःश्वास टाकायचे,
हें तें जीवनकाव्य रोज लिहुनी कोणास दावायचें ?
कोणा शोक रुचे ? प्रभो तुजविना कोणास सांगायचें ?
झालें जीवन व्यर्थ, खिन्न हृदयीं आशा न ती पालवे
वाया जीवन-दीप कीं फडफडे, कां न त्वरें माळवे ?
आतां वाढत काळजी हळुहळू, शोभा कुठें राहिली ?
होई कां मरुभू पुन्हां कुसुमिता ग्रीष्मामधें भाजली ?
पानें तीव्र हिमें गळून पडतीं, घोंगावतें वादळ,
गेली सर्वत्र चीजवस्त उडुनी, ठाके उभा एकला !
नाहीं संगत कोणही मम मना आली गमे झांकळ,
झाला चालुन जीव पूर्ण दुबळा उत्साह ना राहिला.
देवा, तूं झगडावयास मजला थोडा तरी धीर दे
या येथें चढणीवरी वद पुढें टाकूं कशीरे पदें ?

## ६ रे माझ्या हळव्या मना

( सुनीत )

रे माझ्या हळव्या मना तव किती चालायचें रोदन ?
आशा व्यर्थ तुझी तुला कुणितरी देईल आश्वासन,
होऊं खिन्न नको, टळेल कुठुनी कर्तव्य जें ठाकलें ?
कर्तव्यांत नको उणीव पडणें, शोभेल ना तें तुला.
नेकी दाखवलीस आजवरती, हें मानशी भूषण,
आतां तें न वृथा कलंकित करूं, हें ना पिसें चांगलें.
कां वारूसम तूं वृथा भडकशी, सैराट कां धावशी ?
हे कोणी हसती समंजस तुला वेड्यांत काढूनिया.
रे माझ्या हळव्या मना, किति असा बालापरी वागसी,
घालावी समजूत काय करुनी ? हट्टीच तूं आपुला.
जातो अश्रुसवेंच धीर गळुनी, गाळूं नको आसवें,
हा शोभे दुबळेपणा न तुजला, दौर्बल्य ना भूषण.
जेथें आवस आज भासत तुला, अंधार वा भोंवती
तेथें येइल चांदणें अनुभवा, हासेल राकापती.

## ७ जीवन-चित्र

( मेनका )

कोंडमारा जीवनाचा होतसे;
नी कुठें लाभें विसांवा नाकळे
स्नेहभावाची अपेक्षा मी करी,
गोड शब्दां जीव वेडा हा भुले.
मी कुढा वाटे तयांना सर्वथा,
चित्त माझ मीं जरी केलें खुलें,
मी कसें वागूं ? कसें आणूं हंसें ?
वागणें वाटे तयांना वेगळें.
जीव दुःखी दूर जाया वांछितो,
आडवाया यत्न सारे चालले.
होइना संतोष त्यांना मी जरी
तत्सुखासाठीं झटे, रात्री बळें,
जीवनाचें चित्र माझें सुंदर
रंगवाया रंग वा ना कुंचले !

## ८ विजेचा खांब

( लवंगलता )

गजबजलेल्या मार्गावरती उभा विजेचा खांब,
प्रकाश त्याचा पडला होता सभोंवतालीं लांब.
असाच होता तपावरी तो उभा ताठ गर्वात;
मानवशक्तीपुढें न नमला ताठर हा सर्वांत.
प्रतीक यांत्रिक शक्तीचें हें कुठले मानव-भाव
यन्त्रासम कीं काम करावें, भासे हाच स्वभाव.
समीप येती, कितीक जाती नगरांतिल नरनारी,
गृहरत्नांचीं येतीं जातीं चरणें अडखळणारीं.
लोभस डोळे परंतु नाहीं खिळले यांच्यावरती
कळेन याला घडतें जें जें याच्या अंवतीभंवती.
परंतु आहे उभा सारखा कुढत मनांतुन कांहीं
उभा राहुनी असा सारखा कुणास पाहत राही ?
प्रभंजनांच्या समयीं हृदयीं वाढे अस्थिरता कीं
भैरव झेपीसाठीं का हा पाउल पुढती टाकी !
प्रभंजनाच्या समयीं होई याला हर्ष अपार,
गगनांमधली बिजली याला प्राणहुनिहि प्यार !
त्या बिजलीचें रूप पहावें, तेणें नेत्र दिपावे,
आलिंगावें, चुंबन घ्यावें, क्षणांत आणि जळावें.
यांत्रिक बिजलीचा न परंतू ध्यास तयाच्या चित्तीं,
नियमित शक्ती, नियमित कांती, नियमित जीवन ज्योती !
तेंच तेंच तें जीवन म्हणुनी उदासीनता वाढे,
नभांत बिजलीकडे तयाचा जीव सारखा ओढे.
जीवन वाटे धन्य जहालें, वादळ जेव्हां आलें,
उन्नत-मस्तक स्तंभ विजेचा दो बाजूला डोले.
नभांत तळपे बिजली जेवीं नर्तन कुशला बाला,
आजवरीचा वाटे त्याला भाव फळाला आला.
जवळी येतां नाचत नाचत स्पर्श करी अधराला
क्षणैक जीवन उज्ज्वल झालें, लवलें शीर धरेला !

## ९ पतंग

( कोकिळा )

वाऱ्यावरती उंच धावतो गगनीं स्वैर पतंग.
तिथेंच त्याची असे मिराशी,
निरखुन बघतो हा आकाशीं,
ठेवा कसला शोधित बसला, कशांत झाला दंग ! १

डुलतां डुलतां दों बाजूंला
वाटे लागे नीज याजला,
कीं वायूच्या खांद्यावरती झोंपे बाळविहंग. २

वाहे मंजुळ वारा गगनीं,
सा रे ग म येतें श्रवणीं,
दोरीवरती कान ठेवुनी ऐका छान मृदंग. ३

निळेंभोर हें पाहुन अंगण,
सोनेरी हे रविकर पाहुन,
मनीं तरळती याच्या वाटे सुंदर स्वप्नतरंग. ४

दर्शन होतां आकाशाचें,
वेड लागतें नव आशांचें,
सवें घेउनी येते प्रतिभा नवे नवे रसरंग. ५

## १० सायंतारा

( कोकिळा )

हळूं हळूं हो संध्याकाळ,
अवतींभंवतीं विश्व मलूल,
स्वप्नवेळ ये क्षणभर चंचल,
सुखतंद्रेवर मोहमयी या डोले जीवन लोल !

एकच जैसें फूल प्रीतिचें,
एकच तारा गगनीं नाचे;
मेघ भोंवतीं नव रंगाचे,
मम चित्तासम नटे तयानें नित पांथस्थ युगोल !

नभोंगणींच्या दिशा उजळतां,
हृदयीं माझ्या आशा हसतां,
भाव मनींचे कुणि आकळतां,
उंच भरारी घेत गातसे प्रतिभेचा चंडोल.

जेथुन येई शीतल वारा,
ती ही तारा लोचन-तारा,
नक्षत्रांचा वृथा पसारा
करी सफलता जीवीताची अक्षय स्नेह सखोल.

## ११ पिकें कापणारी

( वियद्गंगा )

पहा ती, दूर एकाकी पहाडी पोर रानांत !
पिकें ही कापतां भासे किती तल्लीन गानांत;
खिळो पाऊल येथें, वा गती मंदावुनी चाला !
स्वतां कापूनिया ताटें स्वतां बांधी पहा बाला,
मुखानें खिन्न गीताची लकेरी स्वैर ती घेई;
जणूं गीत-स्वरें खोल दरी ओसंडुनी जाई.
क्रमूनी आरबी वाळू प्रवासें भागले क्लान्त
कुठें छायास्थळीं मार्गीं विसाव्या थांबले पान्थ
तयांच्या स्वागतासाठीं सदा वैराण मार्गांत
असें नक्तंगलें गोड कधीं ना गाइलें गीतः
अशी रोमाञ्चकारी ना लकेरी कोकिळा घेई,
वसंतीं दूर द्वीपांची ढळाया शांतता कांहीं.
तिच्या गानांतला भाव कुणा सांगावया येई ?
अशी कां आर्ततापूर्ण पदांची योजना होई ?
लढाई भूतकालीन, अशा शोकप्रसंगानें
जुन्या काळांतल्या कांहीं, असावें गुंफलें गाणें :
घडे जें आजला किंवा उद्यांला जें घडायाचें
निसर्गप्राप्त दुःखाचें, वियोगाचें, विषादाचें,
गमे नित्य प्रचीतीचें असावें सौम्य हें गीत.
कसें ही तें असो, गाते जणू गानास ना अंत;
दिसे ती ओणवी रानीं, विळा हातांत घेऊनी;
तिचें ऐकावया गाणें उभा निस्तब्ध मी रानीं,
चढूनी टेकडी आलों, निमालें गीत, अद्यापि
तयाचे आर्ततासूर परंतू अंतरा व्यापी.

[ वर्डस्वर्थच्या कवितेचें भाषांतर. ]

## १२ दीपावली

( पादाकुलक )

स्नेह, सुस्थिती, आणिक समता
जोंवर ठाउक नाहीं जगतां
तोंवर संग्रामाची ज्वाला
भडके, जीवन-ध्वज हो कलता.
नन्हे नन्हे ह्या दीपक-पंक्ति
गत-कालाच्या जीवन-ज्योति
प्रभंजनाशीं झुंज खेळुनी
द्विगुणित तेजानें कीं स्फुरती.
या दीपाच्या बघ मध्यावर,
दिसतें जें तेजाळ भयंकर,
जीवांना संदेश सांगतो—
या दीपाचा आत्मा प्रखर.
"वीर निमाले रणसंग्रामीं
असे यायचे कितीक कामीं-
असे तयांची ध्येय-निष्ठता
ध्रुवासारखी निश्चळ व्योमीं—
वदती तुम्हां दाहक ज्वाळा
आम्ही दिधल्या जीवनमाला
परी जीव हा तिळतिळ तुटतो
ध्येय-केतु कुणी पुढें न नेला.
नवरात्रें, सण, नाना छंद
करतां वाटे कां आनंद
दीपरूप हे अमुचे अश्रु
पाजळताती अप्रातिबंध."

## १३ लक्ष्मीपूजन

( सुनीत )

हंड्या दीपयुता, चकाकित किती डोईवरी तोरणें !
झेंडूच्या सुममालिका शुभदिनीं दारावरी डोलती.
दारीं मंगल तैलपूर्ण पणत्या दीपप्रभा सांडती,
दुःखाचे स्वर कीं जयांत लपले ते चौघडे वाजती.
लक्ष्मीपूजन आजला म्हणुनिया वस्त्रें, नवीं भूषणें-
लेवोनी अपुलें शरीर उघडें यत्नें जणूं झांकती.
दुर्गंधी भंवतीं अनंत पसरे सारावया दूर ती-
अंगा अत्तर चर्चुनी जन सुखी आहोंतसें दाविती.
वारा-पाउस-ऊन सर्व पुसुनी भूगोल-वार्तावली
देती पानविडे, निरोप हसुनी आप्तेष्ट लोकांस ते
कंठालिंगन आज देत इतरां त्यांचा करूनी स्तव
कंठालिंगन प्राणहारि मग ते देतील लक्ष्मीस्तव;
सारी कृत्रिमता मनास दिसली उद्विग्नता वाढली
लोकीं दाउन औपचारिकपणा स्नेहार्द्रता वाढते ?

## १४ सणवार

( सुनीत )

जेव्हां ये सणवार, मंगल असें कांहीं तरी ये घरीं,
तेव्हां काहुर अंतरांत उठुनी हो भावना संकुल;
कां हे ? आणि असेंच कां ? मम मना मी प्रश्न नाना करी
माझा चित्त-समुद्र रोधुं न शके संक्षुब्ध अंतर्जल-
कांहीं बैसवुनी सणावर असे संकेत नानापरी
मित्रा भेटुन त्या निमित्त वदती "घ्या प्रीतिचे हे तिळ."
सारा केवळ औपचारिकपणा, ना स्नेहही अंतरीं,
स्नेहाचें करणें प्रदर्शन नको वृत्ती असो स्नेहळ.
पाळूनी उपचार प्रेम हृदयीं काहीं दुणावेल का ?
पाळूनी उपचार द्वेष हृदयीं कांहीं उणावेल का ?
रूढीला खिळलीं पदें म्हणुनिया संकेत पाळायचे
पाळा, पाळुं नका, न कृत्रिम परी केव्हांच वागायचें.
अंतर्बाह्य मनांत एकच असो सद्भावना निर्मळ,
ओठीं अमृत ते नसो, पण नसो पोटांत हालाहल.

## १५ पदसेवा

नाजुक चपला शहरामधुनी,
गांवा आलों, जों न घेउनी,
एक अंगठा तुटून गेला.
खिळा उचकटे वाटी निसटे
एक दोन ते करितां खेटे
तळ पायाचा समूळ गेला.
मखमालीची सुंदर काया
मऊ मऊ ती लागे पाया
आज रंग पण उडून गेला.
ग्रामिण जीवन हवें जगाया,
पाषाणांशीं हवें लढाया;
तो न तिला मगदूर मिळाला.
पदसेवेचें व्रत आचरतां,
मानहीन निज जीवन जगतां
का वीट आज तिज आला ?
आणि तिचे संस्कार नागरी
जानपदांना आम्हां भारी
ही तिची भासते व्यर्थ कला.

## १६ तम भोंवतीं

( चालः-गीतिकेसारखी )

तम भोंवतीं मज दीप तूं,
विजनामधें मज मित्र तूं,
आशा निराशेंतील तूं.
यश लाभतां समतोलता,
अयशांत तूं धृतिनिष्ठता,
चिंतेमधें तूं शांतता.
विपदीं मला विश्वास दे,
विमनस्क मी नव दृष्टि दे,
मी रुग्ण तूं सामर्थ्य दे.
करुनी कृपा कर पालन,
कर दर्शका पथदर्शन,
ने सर्वदा सांभाळुन.
सन्मार्ग तूं, कीं श्रेय तूं,
संपन्नजीवनहेतु तूं,
तुजसाठीं हा जीवक्रतु.

## १७ होउ नको दृष्टिआड

( ओवी )

होउ नको दृष्टिआड    माझें मन काहुरतें,
नेत्रीं कारुण्य दाटतें !
जरी जाशील तूं दूर    हृदीं कोणाच्या बिलगू
कोणा आधार मी मागूं !
काय माझा अपराध    कां तू वृथा रागावशी ?
किती निष्ठूर वागसी !
दुबळी मी खेळूनिया    आशेसवें लपंडाव
हरलें मी माझे डाव.
वाटें संपलें जीवन    क्षण शेवटचा आला,
जाऊं नको या वेळेला.
माझ्या हृदयाची भूक    कधीं सांग शमणार ?
कसें कळवूं अन्तर ?
आजवरी धीरानें मीं    साहियल्या तुजसाठीं
जीवनाच्या यातायाती.
नातें विसरुन सारें    अतां तरी बोलूं गोड
नको करूं हिरमोड
तनु लागेल भूमीला    त्याच्यापूर्वी क्षण कांहीं
तुझ्या अंकीं निद्रा देई ।

## १८ घरभरणी

( चंद्रकला )

आशे, हासत ये घराला हृदयाची राणी,
गृहप्रवेशानें होउं दे मंगल घरभरणी.
गोड किती लाभे आजवर हा तव सहवास,
आलें सहवासें तुझ्या या भरतें प्रणयास.
प्रणयाची पूर्ती परिणयीं झाली आज गडे,
बघ जीवन मार्गीं घातले कोणीं रम्य सडे.
तुझें आणि माझें सारखें पाउल आज पडो,
साक्ष मनोमन ही प्रीतिची अपुल्या आज घडो.
येई प्रिय देवी, पाउलें मंद जरा टाक,
तव पदनादानें कळे तव हृदयाची हाक.
येई प्रिय देवी, पाउलें टाक जरा मन्द,
पदसंगीताचा तुझ्या गे लागे मज छंद.
येई प्रिय देवी, पाउलें टाकी मन्द जरा,
सोन्याच्या पायीं येउं दे लक्ष्मी आज घरां.
आनंदें अपुल्या स्वागता स्नेही जन जमले,
बघतिल बहु कुतुकें तुझें गे मन गेहीं रमलें.
हे माझे स्नेही आप्तसम मला न कांहीं उणें,
मिळेल सर्व मला वांछिलें तुझिया प्रीतिगुणें.

## १९ माझी ताई

( सुनीत )

माझें अंतर कीं दुजे, मम जिवा दुःखांतला आसरा,
आली स्नेहळ मातृतुल्य भगिनी फार दिसांनीं घरा.
होती प्रेमळ, अंतरांत करुणा वाटेल हेवा कुणा !
बोलावे सुखदुःखभाव तिजशीं ऐशी मनीं भावना.
कांहीं शोककथा तिला कळवितां, त्याही तिनें ऐकतां
हा! हा! लोचन वाहती घळघळा, ये ना पुढं बोलतां.
झालें दुःख मला, तिला दुखाविलें, दो जीव कष्टी असे,
पाहावें तिज जानकीच दुसरी कारुण्य-मूर्ति दिसे.
नाहीं मी मग बोललों नतमुखी निःशब्दशी राहिली,
आशा येइ परंतु एकवटुनी आशाळ नेत्रांतुनी,
घेते संयमुनी पुनःपुनरपि व्याकुळ ती जाहली,
मातें अश्रुत दुःख त्यांत दिसलें, जें दाविना बोलुनी.
गेलें होरपळून चित्त अवघें संसार तापानळें
तो हा जाण निवावयास नयनीं दाटून येती जळें

## २० रुग्णशय्येवर

( सुनीत )

जीवाशा नसली तरी क्षणभरी येऊं नको तूं यमा,
नाहीं हे तुटले अजून इथले संबंध जे जोडले:
निद्राशून्य हताश येथ पडलों मी रुग्णशय्येवर,
कल्याणोत्सुक माउली मम वसे साशंक मत्संनिधी.
"द्यावें सौख्य तिला," मनांत उरली आशा अपूरीच ही,
तीचें दुःख अपार पाहुन मना वाटे वृथा जीवन;
माझे प्रेमळ चार मित्र भंवती येथें जमा जाहले
त्यांच्याशीं करणें विनोदन-कथा सौहार्द दावावया—
त्यांचें स्नेहळ चित्त तत्सम जगीं नाहींत कोणी जन,
आशा एक मनांत, "आज अपुला संसार नाहीं जरी
संसारीं रमले तयांस बघुनी आनंद पावो मन,"
कांहीं काळ म्हणून मूढ मन कीं जीवामधें गुंतलें.
विज्ञप्ती करणें कठोर हृदया, वा काननीं रोदन,
त्वत्सर्वंकष-शासनांत दिसुनी ये प्रत्यहीं रुद्रता.

## २१ भावकवी

" तुला जन म्हणती भावकवी,
अंतर तोषे, रसाळ कविता ऐकुन नित्य नवी."
" धावलें गाणें परिसाया,
श्रवण सुखाला जीव आसवे, तरारते काया."
" गा कवे, कविता मंजु स्वरें,
जेणें होई मन्मन तन्मय, विषाद-भाव तुरे."
" बैसलें उत्सुक तुजजवळी,
किती वेळ मी अशी बसूं रे, श्रवणें आतुरलीं."
" उमजुनी घे लोचन भाव,
स्वेदजलाहि देहावरचे, जाणे अनुभाव."
" कां न तव रसना अजुन स्फुरे ?
रस-प्रवणता एकाएकी, का तव आज सरे ?"
" रसिकता कां न तुला पटली ?
अशी हेळणा पर हृदयाची, ही ना रीत भली."
" चाललें दूर कवे आतां,
नकोस बाहूं तान घेउनी मज जातां जातां."
खंडिता रागेजुन जाई,
स्तिमित दृष्टिनें विद्ध मनानें कवि पहात राही.
खळाळुन भाव मनीं आले,
हृदयीं कविता, नयनीं अश्रू तया न आवरले."

## २२ आवाहन

भूपाळी

धाव धाव मंगले, जानकी, धाव धाव मंगले
हृदयविदारक भाव मनींचा कैसा तुज ना कळे ?
योग-क्षेमावरी जयाचा विश्वगोल डोलतो,
तोच तुला मी सुभग सुंदरी प्रेमानें बाहतों.
हेम-मृगाची काया सुंदर तुजसाटीं आणिली
" डोळे भरुनी तुवा पहावी " आस मनीं राहिली.
पर्ण-कुटी ही सुनी सुनी गे सारी मज भासते
स्मशानांत येउनी बैसलों ऐसें मज वाटतें.
सौमित्राला, प्रिय भावाला शोधाया धाडलें
नाहीं त्याला परंतु दिसलीं राजस तव पाउलें !
हिरव्या कुरणावरती हरिणी विशाल नयनांनीं
तुला पाहती भिरभिर भंवती त्यांची तूं स्वामिनी.
गोदा-कांठीं कुंजामाजी खेळसि तूं सुंदरी
ते ते शोधुन कुंज पाहिले, शोधूं कोठें तरी ?
परिहासाचा समय नसे हा दुःख मला जाहलें
शिणलीं नयनें, शिणली काया, शिणलें मन कोवळें.
सूर्य जातसे क्षितिजाखालीं दाटे अंधार,
अंधारांतुन विषम वाट तुज नाहीं दिसणार.
चंद्रहि आहे उगवायाचा अजून नीलांबरीं
पायाखालीं पाहुन येई लौकर अपुल्या घरीं.
नाहिंस जवळीं कोठें म्हणुनी सूर न तूं ऐकला ?
लग्नापासुन शब्द कधीं ना माझा तूं मोडला-
चुकली कोठें ? भीती वाटे ! श्यामल शंफांतुनी
सांगा सांगा तरुलतिकांनो कोठें मम गेहिनी ?

## २३ जोडीदारास

### मोहिनी

पहा रम्य शोभा मोठी आपुल्या समोर,
शांत नील आकाशांत नटे चंद्र-कोर !
तुझ्या मैत्रिणींचा मेळा तुझ्या भोंवताली,
इंदुच्या सभोंती तारा जेविं अंतराळीं,
मला इंदु-शोभा वाटे त्याहुनी निराळी,
तुझ्या चित्त-चंद्रासाठीं जाहलों चकोर ॥ १ ॥
दारु किती, झाडे नाना उडे चंद्रज्योती,
वरी जाउनिया त्यांचीं फुलें खालीं येतीं,
नभींच्या जणूं ताऱ्यांची इथें होइ दाटी,
पिसारा करुनी किंवा डुले मत्त मोर !!
वाजतात मंजुळ वाद्यें झडे चौघडा गे,
वस्त्र-भूषणांनीं नटले लोक पुढें मागें,
आणि दोन बाजूला हे होउनिया जागे
पहायास कौतुक आले लोक सान थोर !!

## २४ दिवस-विगमे

( सुनीत )

संपे पाउस आणि इंद्र-धनुचें पूर्वांचलीं तोरण
किंचित्काळ हंसे निमे पुनरपी अस्तास जाता रवी,
जाती मावळतीस हेम किरणें, निस्तेजते पालवी,
आल्या श्यामल साउल्या तरळत्या विश्वावरी धाउन.
घेते नंतर कष्टतप्त हृदया नैराश्य आच्छादुन
माझें पाउल मंद शून्य हृदयीं अस्वस्थता वाढवी
दग्धाशा जगतीं अमंगळ जळें नेत्रामधें खेळवी.
झालों जीवन-दायिनीस सदनीं भेटावया उन्मन,
माता उत्सुकलोचना करुनिया गेहीं दिवेलागणी
होती पाहत वाट, दर्शन तिचें वाटे सुधा-शिंपणी;
द्वारीं पाउल टाकता पुलकिता माझी तनू जाहली,
आला गंध मनोज्ञ मंद जळतां कर्पूर दीपावली.
देवा मंगल आरती नमुनिया भावें तिनें गाइली,
कष्टाची परिहारशक्ति सगळी कीं त्यांत सामावली.

## २५ सखी-संलाप

( कोकिळा )

" प्रेमळ भावें तुला सांगतें सोडुनिया संकोच
खुपेल हृदया ऐशी नाहीं बोलामध्यें खोंच,
तुझ्याच साठीं खरें बोलतें,
तळमळ जीवाची ना शमते,
स्नेह जिव्हाळा भंवतीं बघतें,
कुठें पांखरावाणी पसरूं केविलवाणी चोंच ॥
जरी टाकुनी कांहीं वदलें,
क्षमा मागण्या स्वतांच आलें,
स्नेह-बंध बांधूया सुटलें,
केव्हां केव्हां बोलत असतां राहत नाहीं पोंच ॥
बळें दुज्याचें मन दुखवावें,
आणि त्यांतच सुख मानावें,
हें न मनाला मुळींच ठावें—"
मेघ लागती जल वर्षाया वादळ वाहे तोंच. ॥

## २६ सखी–संलाप

( केशवकरणी )

" फार दिसांनीं गांठी भेटी पडतां अपुल्या सखे,
वाटते किती जीवा हालकें ।

जीवन डोले, हांसे नाचे, लोचन संतोषले,
सुखाचे भाव मनीं वाढले.

पत्र कसं ना कधीं धाडलें, मन झालें कां कुठें ?
अशी कां रुसशी मजवर गडे ?

कडकडून भेटूं संनिध येइ सये,
खोलुनी अंतरें हितगुज गे सांग ये,
छे, भाव मनांतील कधींच रोधूं नये,
जलरूपानें भूहृदयींचे भाव वाहती सुखें.
तियेचें हृदय सदा बोलकें !

महिना झाला, विवाह झाला, कौतुक झालें किती,
पाहिली वाट तुझी मी अती.

कौतुक केलें वडिलांनीं, हें स्थळ त्यांना आवडे
शोधिलें आधीं तें मी गडे

किति प्रेमळ सासू माझें कौतुक करी,
आईच दुजी वा तिची न कोणा सरी,
कन्याच मानुनी मजला ती सावरी;
कुशींत जावे तिचिया जेव्हां होई मातृस्मृति
लाभतो धीर तिच्या संगतीं.

प्रेमें बोले शिर कुरवाळी उदास जं मन्मन
मोजुं मी किती सुखाचे क्षण
' प्रेम हिचें तूं सर्व चोरुनी केलें मज पारखें."
भांडती सासु नि ते सारखे.

ह्या आप्तेष्टांच्या विवाह-भेटी पहा,
अन् यांचा चपलाहार किती छान हा,
हा घाट कुड्यांचा पुरवी मनिची स्पृहा,
बाईनीं या कुड्या आपुल्या दिल्या मी न मागतां
नी कुणीहि ना सांगतां.
रौप्य-करंडक खण जरतारी घेउन त्यांनीं दिली,
पहा ही भेट तुला आणिली.
वाटू नये वाटतो परी गे हेवा तव मंगले
माणिका कोंदण कीं लाभलें.
दुष्प्राप्य भाग्य हें दुजा न लाभायचें,
धाकांत सारखें आम्ही वागायचें,
हे भाव कुठें पण तसेच ठेवायचे,
भयवेळेला धरि हृदयाला अशी न गे माउली
माउलीसमान मज लाभली.
जेव्हां जाती फिरतीवर 'ते' विरंगुळा कोठला ?
घरीं गे कुणी पुसेना मला,
परन्तु गांठीभेटी पडतां फार दिसांनीं सखे,
वाटतें किती जिवा हालकें."

# २७ हे कोण ?

( मुनीत )

संध्याकाळ सुरम्य वेळ सगळे जातात खेळावया,
मी येथें बसतां, विषण्ण हृदयें माझ्या घरीं एकला,
संपे सांज हळूहळू, तम पुढें ये भीति दावावया,
तेव्हां वादळ आंतलें खवळलें भेसूर वाटें मला.
नाहीं आज घरीं कुणी, मन कुठें माझें रमेना मुळीं,
मित्रांनीं मजला हताश हृदया कीं आजला सोडलें.
चित्ता येउन खिन्नता घडिघडीं शांती मनाची ढळे,
तेव्हां चाहुल लागतां कुठुनिया आशा मनीं वाढली.
कोणीं लावियले प्रदीप गगनीं, तैसे घरीं सोज्वळ,
—आशाप्रेरक हा प्रकाश तिमिरीं, ही आस दुःखांतली—
गेहीं लावुन दीप, आर्त नयनें वाटेकडे लावलीं,
आली कोठुन हालचाल श्रवणा, झालों मनीं चचल.
वाऱ्याच्या लहरी अनेक उठुनी दारें जरा वाजलीं,
पाठीशीं बघतां वळून दिसली माझी मला सावली.

## २८ मी भिकारी ?

( रक्षा )

मी नच आज भिकारी,
आलें जरी तव दारीं ध्रु०

भीक नको मज
माझी मज चिज
परत मिळावी सारी
आलें ह्या निर्धारीं. १

ओटी मागुन
तेथें राहुन
झालासी व्यापारी
धूर्त महा व्यवहारी. २

घेउन नंतर
माझें हें घर.
आलासी जडभारी
काढून मज बाहेरी ३

'देइन लौकर
तुझें तुला घर'
बोल तुझे जरतारी
वाणी मधु स्रवणारी, ४

तुझ्या अंतरीं
खोल कुठें तरी
भाव परंतु विखारी
मी न आज भुलणारी. ५

असें विसंबुन
राहूं किती दिन
जा आजच बाहेरी
तूं मित्र न, तुं रे वैरी. ६

## २१ होते भेट जरी

( सुनीत )

पाहे वाट तुझी, निरोप न तुझा आला, इथें एकटा
मी उत्कंठिताचित्त, अल्पच कुठें लागे जरी चाहुल,
मातें भान नसे, वळे कितिकदां दाराकडे पाउल,
वाढे आणि क्षणोक्षणीं अधिरता, किंचित् सुखाची छटा
भासे त्यांत, गमे स्मृतींत तुझिया व्हावें जरा उन्मन,
तेव्हां उन्मन या स्थितींत असता निद्रा जरा लाभली.
होतें संनिध पत्र. विस्मय पडे, आलें इथें कोठुन ?
तूं आलीस ! खरेंच ? भेट न घडे, वा तूं बजें टाकली ?
वार्ता ये शुभमंगलाहि श्रवणीं, आनंदलें मन्मन
तूझ्या मंगल जीवनांत मजला लाभे सुखाचा क्षण;
आली अल्प न भेट, का भय तुला बोलेन मी टोंचुन
छे ! छे ? मत्सर भावना न हृदया गेली कधीं स्पर्शुन
होते भेट जरी प्रसन्ननयने, ते लोचनाल्हादक
—येतें मोहरुनी सुखें मन तरी—पाहूनिया त्वन्मुख.

## ३० जेव्हां येशिल तूं

( सुनीत )

तूं जातेस तरी पुन्हा वद कधीं येशील आशालते ?
पाहूं वाट किती ? नकोच अथवा ! कां ही अपेक्षा तव ?
रंगाळे सहवासचित्र नयनीं, कानांत नादे रव,
वाटे सर्व कला अपूर्णच मला, कांहीं उणें वाटतें.
का येणार पुन्हा मुळीं नच कधीं ! जा तूं विलंबें जरा,
पाहूं दे नयनें विमुक्तनयना, राहील मागें स्मृति,
त्या लाभेल स्मृतींत श्रांत हृदया कार्यास कांहीं धृति,
त्वद्रेखाकृति रंगवी मम मना, चित्रा जशी अंबरा
अन् कालक्रमणें बुडेल स्मृतिही, कालांत सारें बुडे
झालें पूर्ण विरक्त जों न मन हें पाहे जरा मागुती
होतां शुष्क तडाग, त्यांत कमळें नेत्रास ना भेटती
नेत्राल्हादक तें उरेल न तुला सौंदर्य तेथें पुढें-
जेव्हां येशिल तुं सरागहृदया भेटीस, नेत्रोत्सव
तेव्हां रम्य घडेल होइल पुरा मत्प्रीतिचा गौरव.

# ३१ मुद्रिका

शकुन्तलेचें मनोगत

( जा. मुद्रिका )

मुद्रिका प्रणय-पीडितें तुवां अर्पिली,
स्मृतिदीप मंद तेवे हा, पाहतें तयें वाटुली;
नेत्रांत तरंग दृश्य, बसुन सन्मुख
ठिबकत्या मधासम बोल पाजून दिलें तूं सुख;
"तुज बसविन सिंहासनीं,
तूं राणी हो मानिनी"
घेऊन कंपिताङ्गुली बळें घातली
मुद्रिका सुढाळ हिऱ्याची, ती वेळ धन्य वाटली ! १

तूं वनांत मृगया करावया येउनी,
तूं शौर्यें मृग नी प्रेमें मृगनयना घे जिंकुनी.
तव विशाल बाहू विशाल वक्षःस्थल,
तव शौर्य ऐकुनि मोठें मम झालें मन संकुल.
या अनोळखी भावना
पीडितात माझ्या मना,
अन् प्रीतितरी अंतरीं निघाली पुढें,
रे भरलीं विकारसमीरें मम सुखाशांचीं शिडें २

हे अस्ताचल रंगले लाल केशरी,
जणुं रासनहाणी पाणी सांडलें खालतीं वरी;
हा रासाचा केवढा थाट मांडला,
सित रांगोळ्यावर येथें हा गुलाल कुणि टाकला.
वाटतें तुझ्या संगतीं
बसुं स्नानाला खालती;
ह्या समीर-लहरी घडे घेऊनी करीं
धरतील घनांच्या धारा रे झिम झिम डोईवरी. ३

हा रानलतांनीं मांडव बघ घातला ,
ही उन्नत वनभू मातें वेदिका गमे मंगला.

द्विजराज तरूवर गात मंगलाष्टकें,
अक्षतार्थ शीर्षीं पुष्पें फेकती तरू कौतुकें;
हा निसर्ग करितो स्वतां
गांधर्व-लग्न-सिद्धता !
मज असीम प्राशुन संमोहन भासलें,
ह्या कर्मठ रूक्ष वनाचें नव नंदनवन जाहलें. ४

जाति जन्म भू.

मज मुद्रा देउन राजपुराला जातां तूं तांतडीं,
तुज वांछी शुभ मार्गातें मी हांसत रे घडिघडीं
तें अनुसूया मला म्हणाली, "हसूं नये एवढें
जी अपार हसते तीच्या प्राक्तनांत लिहिलें रडें.
हें तुला गडे शोभलें
निज जनका अवमानलें ?
हें तूं न विसरशी कीं तूं असशी कण्वाची कन्यका,
गे मुनिजन माग निराळे, तूं नसे राजदारिका" ५
हीं दहा युगें लोटलीं गमे, जरि दहा दिवस जाहले,
रे उचला पद पळांनो आपुलीं मंद पाउलें.
हीं मुद्रेवरचीं सर्व अक्षरें संथपणें संपलीं,
तूं मूळ धाडिलें नाहीं धांवत्या इथें पाउलीं
कीं पडे तुला विस्मृति ?
कीं फसले मी नेणती ?
मी साधी भोळी तुझें मुळीं हें नाटक मज ना कळे,
संस्कार नागरी कैसे रे जानपदांना कळे ? ६
ही अज्ञजनांची अशी वंचना, बरें न हें जाहलें.
तव कुलास या विपेला हें सांग किती शोभलें ?
तूं भूप म्हणुनि सांगतें तुला मी "प्रजेस तूं रक्षिता
तूं अगत्य जाणुन घेई निजप्रजामनें सर्वथा-
जर मातें तूं वंचिलें,
हें लोकांनीं जाणलें,
ना विसंबून राहतील ग्रामिण पौरजनीं या पुढें,
हा विपाक विश्वासाचा जरि त्यांच्या दृष्टी पडे." ७

# ३२ समर्थन

( श्यामाराणी )

सखीः- वाट बुडाली अंधारांत,
दिसे न भंवतीं वस्तुजात,
तूं ना दिससी काळोखांत;
तीः— मार्ग तयाला कळवायाला रुणझुणती नूपुर ॥ १ ॥
सखीः- वारा पडला, तरू शांतले,
दिशादिशांतुन सूर विराले,
मजसंगें ना वदसी बाळे;
तीः— शब्द तयाला कळवायाला धडधडतो गे ऊर ॥ २ ॥
सखीः- संनिध बससी, प्रियकर आला,
वद डोळयाला भिडवुन डोळा,
प्रीत ना तरी कळे न त्याला;
तीः- भाव तयाला कळविल माझा स्वेदजलाचा पूर ॥ ३ ॥
सखीः- मेघामागें लपले तारे,
विझवलेस तूं प्रदीप सारे,
दिसेल कां तव वदन बावरें;
तीः- वक्षःस्थळ-रत्नांचा भंवतीं प्रकाश पडतो दूर ॥ ४ ॥

## ३३ क्षीणकाय

दारांत उभी क्षीणकाय !
हात तुझा थरथरे
मस्तकांत भिरभिर, भिरभिर
चित्त आपुलें पिसाट
क्षण एक करुनी शांत,
अचपळ मन बेबंद वारु
अवश करी हें जनांस,
संयमिलें तरिहि तुवां उद्विग्न चित्त.
जीवन हें वैराणभूमि
तुवां तुडविली वणवण,
कंठ शोषला परंतु
लोचनास ना दिसे एकहि जलाशय.
जीवन तव शुष्कवेल
रसाविहीन रसाविहीन;
आधार तरु पवनलोल
आधार नसे वेल मात्र असहाय.
आणि कधीं एकलीच
दारिं उभी राहतेस,
काळोखुन येइ रात,
माजतें तुफान आंत-
सजल जाहले नयन,
कंठ आणि गहींवरे ऽ
दीर्घ उच्छ्वास निघे हाय ! हाय !
मार्गावर व्याकूळ नेत्र,
हातांत जुनें एक पत्र
दिवस मास वर्ष वर्ष लोटलें
क्षितिजासम ध्येय मात्र दूर जाय.

तनु अशक्त जरि असेल,
आशेवर मन तगेल !
दिवसाच्या साहून शीण
संध्येला खिन्न हृदय
अजुन दिसे दारांत उभी क्षीणकाय.

# ३४ अपेक्षा

( मंदाकिनी )

कीं वाटलें येशील तूं हुहुर दाटे अंतरीं,
पाऊल हें दाराकडे, चाहूल येतां सत्वरीं,
व्याकूळ झालीं लोचनें जाती क्षणामागें क्षण,
दारीं प्रतीक्षा मी करी त्वद्दर्शनातें उन्मन.
मी एकला माझ्या घरीं ही आग चित्तीं पेटते,
जागा विसांव्याची कुठें ? ओकेंच सारें भासतें.
कोठें बसूं ? कोठें हसूं ? कोठें जिवाला शांतता ?
मातूंच कीं मी जाहली त्वत्संगतीची सांगता !
ना जीव आतां मोहरे उल्हास वाटेना मना,
या भग्न जीवाची तुला देऊं कशी मी कल्पना.
येशील ही आशा गमे माझ्या मनातें चंचळ,
वेराण वाळू भोंवतीं ना भासवी मायाजळ.
येतां फिरुनी तूं गृहा आहे उभा मी स्वागता,
तैं त्वन्मुखींची पूर्विंची दावूं नको गे म्लानता.

## ३५ तेव्हां प्रीति पुसून

( सुनीत )

कानीं मीं तिजला हळूं विनविलें, " तेथें बसूं सैकतीं,
लोकांचा उपसर्ग येथ भंवतीं, तेथें मिळे शांतता. "
उत्साहें पद टाकुनी क्षण तिथें गेलों तिच्या संगतीं;
कांहीं वेळ समस्त मूक दिसलें, सर्वत्र गंभीरता.
" जीवाची प्रिय व्यक्ति कोण तुजला, " ती शांततेनें वदे,
" आकांक्षा तव कोणत्या ?"–खळबळे आंतुनिया अंतर.
" नांदी संसृति–नाटकास शुभही तूं गायिली ना मुदें ?
आशा होइल पूर्ण, संतत अशी राहेल प्रीती जर."
जीवाची परिपूर्तताच मजला शब्दांत एका गमेः
मी वाळूवर "प्रीति" शब्द लिहिला हस्तांगुलीनें तिथें,
तेव्हां यौवन भावना उमलल्या, कंठांत प्रीती घुमे;
माझ्या कल्पकतेस बंधन कुठें ? संभाव्यताही कुठें ?
तेव्हां 'प्रीति' पुसून 'स्नेह' लिहितां अस्वस्थ वाटे मला,
झाली शून्य मनःस्थिती क्षणभरी दाटून आला गळा.

## ३६ प्रतीक्षा

( ओवी )

पाहीन मी तुझी वाट
    जरी अंधारल्या दिशा,
    माजे भोंवतालीं निशा. १

पाहीन मी तुझी वाट,
    पाहत मी पाठमोरी,
    तुझी मूर्ति मोहणारी. २

पाहीन मी तुझी वाट,
    मन ठेवून निश्चल,
    कधीं काळीं तूं येशील. ३

पाहीन मी तुझी वाट,
    काय मनामाजीं चिंतूं,
    दूर होईल का किंतु ? ४

पाहीन मी तुझी वाट,
    प्रीत माझी पतंगाची,
    आत्माहुती ठेवायाची. ५

## ३७ लागले तुझ्या वाटेला

( मोहिनी )

लागले तुझ्या वाटेला भावपूर्ण डोळे,
तुझ्या दर्शनाची आशा मनीं नित्य घोळे.
तेधवा उभी दारीं तूं रेलुनी जराशी,
मस्तकीं रवीची खेळे पीत रश्मिराशी,
कोण रूप-संपत्तीची एवढी मिराशी !
रूप आगळें पाहुनिया खिळावेत डोळे.
ऐकली लकेरी तेव्हां व्याकुळ स्वरांची,
आर्तता दिसूनी आली तुझ्या अंतरींची,
मनांतुन दाटी झाली व्यग्र भावनांची,
रूप विस्मरूनी गेलों, चित्त खिन्न झालें.
उदासीन झालों चित्तीं तुला पाहतांना,
पाहिलें तुझ्या नेत्रांना अश्रु सांडतांना,
आणि लोचनांना माझ्या अश्रु आवरेना,
चित्त हें अभावित माझें व्याकळून गेलें.

## ३८ दर्शन

( प्रणयप्रभा )

द्वारांत उभी होतीस गडे
 दृश्य खेळतें नयनापुढें.
अजुन आठवे उभट चेहरा,
छटा कांचनी किंचित् गोरा,
गवाक्षांतुनी येतां वारा
 तेथ मुक्त कच स्वैर उडे. १
गौर लोचनें विशाल सुंदर,
त्यांस पापण्या काळ्या भोर,
हिमवसना तव जशी किनार,
 घनांआड जणूं वीज दडे, २
आतां केव्हां मंद पदांनीं
जातां तव बंगलीवरुनी
दृश्य तरंगे माझ्या नयनीं,
 परि मी न पाहतों तुझ्याकडे. ३
आणि एकदा मोह पावुनी,
लोचन अपुले उंच करुनी,
तुला पाहिलें धीर धरुनी,
 परि तूं न तिथें दृष्टीस पडे. ४

## ३९ ओळख

(ओवी)

झाली तुझी ओळख,    मजभोंतीं सृष्टि हासे
                  तशी तुझी दृष्टि भासे.
झाली तुझी ओळख,    स्फूर्ति दाटे अंतरांत
                  उसळतें भावगीत.
झाली तुझी ओळख,    आज पूर्ण होइ आशा,
                  उजळल्या मनोदिशा,
झाली तुझी ओळख,    तव लोचन भेटले,
                  मनीं भाव अंकुरले.
झाली तुझी ओळख,    दारीं उभी तूं सन्मुख,
                  मला लाभे माझें सुख.
झाली तुझी ओळख,    प्रीतीचें ग फूल फुलें,
                  मन आनंदानें डुलें.
झाली तुझी ओळख,    नवलाख दीपज्योती
                  माझ्या मनीं तेवताती.
झाली तुझी ओळख,    शुक्रतारा ये उदया,
                  मार्ग माझा उजळाया.
झाली तुझी ओळख,    माझे नेत्र ओवाळती,
                  तुज प्रेमानें आरती.

## ४० जाहली मलूल संध्याकाळ

( कोकिळा )

जाहली मलूल संध्याकाळ·
रवी मावळे धूसर गगनीं,
जात कोटरीं खग परतोनी,
जणूं नदीचें निश्चल पाणी
पहाड माथा उदास भासे, उदास सारा माळ.
पुढें झोपडी शेतामधली
केवळ रेषाकृती राहिली,
गत विभवाची स्मृती भासली,
एका मागुन एक सरकता छाया कृष्ण विशाल
धूसर हे वटवृक्ष जाहले,
मंदिर लपलें सीमेवरलें,
गगनामाजीं बाष्प दाटलें,
ऊर तयाचा भरुनी आला मजसम कांहीं काळ
एकच तारा नभीं प्रकाशे,
प्रीत तुझी पण तशीच भासे,
विरंगुळा मज स्मरण- विलासें,
स्मृती तुझी कीं तमोविनाशी स्नेहें सिक्त मशाल.

## ४१ तुझी माझी गांठभेट

( ओवी )

तुझी माझी गांठभेट झाली माळरानावर,
पायाखालीं टोचणारे खुस्टले तृणांकुर.
जलहीन तो ओहोळ, खडकाळ सारा माळ,
तुज लोभसपणानें देखियले कांहीं काळ. १
तुझी माझी गांठभेट झाली वडाच्या खालती,
पानें उन्हाळ्यांत कांहीं विखुरलीं सभोंवतीं.
तुवां पाऊल टाकतां झाली थोडी सळसळ,
तुझ्या दर्शनें अंतरा माझ्या होई खळबळ. २
तुझी माझी गांठभेट झाली गिरीपायथ्याशीं,
गेली होतीस देवीच्या शुक्रवारीं दर्शनासी,
मीहि प्रार्थिलें देवीला जोडूनिया दोन्ही कर,
राहो संतत "देवीचा" कृपालोभ मजवर. ३
तुझी माझी गांठभेट झाली होती बाजारांत,
तुज निवांतपणानें पाही जन-समूहांत,
आणि आलीस सांनिध किती प्रसंग आगळा,
दोन ग्रहांच्या युतीचा वाटे जाहला सोहळा. ४
तुझी माझी गांठभेट झाली लग्नमंडपांत,
तेव्हां सौभाग्यभूषण शोभे तुझिया कंठांत.
तुझ्या दारास लागलें शुभ श्रीफल-तोरण,
किती राती घडायाचें माझ्या डोळां जागरण ? ५

# ४२ चांदण्यांतील भेट

( सुनीत )

तूं दारांत उभी, विधू उगवता जैसा उमाळ्यावर
तैसें भाळ तुझें प्रसन्न दिसलें, आशा मनीं हासली,
वृक्षांची कुजबूज, भास घडला वेलीसवें चालली,
आकाशीं अवनीवरी पसरलें तैं चांदणें सुंदर.
डोले हा निशिगंध, ही फुलछडी ज्योत्स्नेंत वाऱ्यावर,
गेली सर्वच चांदण्यांत बुडुनी मागें पहा नारळी,
धुंडा डोंगर चांदण्यांत बुडला, तैसीच ही बंगली,
जावो प्रीति-रसीं बुडून तुझिया हा जीव प्रेमातुर.
वाळू बारिक चांदण्यांत चमके, तेथें जरासे बसूं,
हाताची जुळणी, तशीच जुळणी होवो मनाची गडे,
जीवाची रमणीयता, सफलता ह्या मीलनानें घडे,
सांगूनी हितगुज, अंतर खुलें दावून प्रेमें हसूं.
विश्वाला सुखवीलसा धवलिमा व्यापूनिया राहिला,
माझ्याही तव दर्शनें हृदयिंचा काळोख गे संपला.

## ४३ केले भाव खुले—

(सुनीत)

कां आलों ? मज ना कळे, तुजकडे, ना रोधतां ये मन,
वाटे तूं जलदेवता सदय, मी संतप्त तृष्णातुर,
येई ग्लानि मना, तुझ्याविण गमे तें खिन्न जें सुंदर,
माझें अंतर हासतें सुखित हें होतां तुझें दर्शन,
तूझा गोड स्वभाव, आणि सरळ सारें तुझें वर्तन,
भाषा भासतसे तुझी मधुमयी तैसेंच नी अंतर,
किंवा अंतर सागरासम तुझें गंभीर जात्या स्थिर,
झालीं, होतिल वादळें, नच चळे गांभीर्य एक क्षण.
वाटे चंचल जीवनास तुजला येई दिशा दावितां,
वाटे कीं मज त्वत्सहाय्य घडतां संसार हो मंडित,
वाटे संसृतिभार हा जड मला, नाहीं कुणी संगत,
मी केली तव याचना पटुमती हें ये तुला जाणतां.
केले भाव खुले, प्रसन्न हृदयें येशील कां मद्गृहा,
आशा तूं मज भाससी, तुजमधें कीं सांठली मत्स्पृहा.

## ४४ सौभाग्य

( सुनीत )

कंठीं मंगलसूत्र, लेवुन नवी साडी, नवीं कंकणें
सौभाग्यें नटली कुणी नववधू आली सखीच्या घरीं:
" जातें मी पतिच्या घरां, पुनरपी होईल कां भेटणें ? "
बोले शब्द रसाळ गद्गद रवें, हो कावरीबावरी,
" संसारीं जपुनी पदार्पण करी संसार शोकाकुळ,
कोठें वागुं नकोस उद्धटपणें, " बोले सखी प्रेमळ-
" रागें टाकुनि बोललें तर कुणी बोलूं नये आपण,
ज्यांची तूं सहचारिणी वळवुनी घेई तयांचें मन—
किंवा ठावुक जें तुला न, भय मी त्याचें कसें दाखवूं ?
मानी जीवन गोड हृष्ट हृदयें संसार हा सुंदर."
हेवा वाटतसे बघून सुभगालंकार चेतोहर,
आला ऊर भरून-अस्फुट वदे-चित्तांत कष्टी बहू
विद्येनें विभवें तशीच विनयें आहें जरी मी गुणी
रूपावांचुन जीवितेश-रहिता जीवीतनौका सुनी

## ४५ जागरण

( सुनीत )

तूं येशील म्हणून वाट बघतें येशील तेव्हां खरें,
वाती सारुन स्नेहपूर्ण भंवतीं मीं मांडले हे दिवे,
गेलें अंग गळून, धीर गळला, एथून ना हालवे,
जाते ज्योत जळून, वात पुढती सारावया ये त्वरें.
अर्धी रम्य कथा तशीच उरली झाला कसा शेवट ?
गेली संकट तें निभावुन कशी ती राजकन्या पुढें ?
अधा डाव तसा तसाच पुढती, मोडून जाशी पट,
माझें व्याकुळ चित्त मात्र अजुनी संदेह डोहीं बुडे.
झाली हातुन आगळीक म्हणुनी तूं काय रागावसी ?
दावी स्नेहरुपा उदार हृदया ऐसें कसें वागसी ?
ही आशा हृदयांतलीं मम हृदीं कोंडूनिया राहिली;
बोलावे सुखःदुख भाव तुजसी, आशा तुझ्या पाउलीं.
गेली वेळ टळून, अश्रु गळले दाटून आलें धुकें,
अंधारांत पुनः पुन्हां उमटले आर्तस्वरीं हुंदके.

# ४६ बाळासाठीं

( ओवी )

माझ्या मना वेड लागे — बाळ डोळयांनीं पहावें
आणि मना सुखवावें.

कुठें पहातां रांगतां — बाळ कोणाचें अंगणीं,
काहूरतें माझ्या मनीं.

आणि घ्याया त्यास जातां — दूर दूरच तें जाई,
बाळ माझें असें नाहीं.

फार दिसांनीं भेटतां — येईल तें माझ्यापाशीं,
बिलगेल चरणाशीं.

आणि कडेवर घ्याया — मोठ्या आशेनें पाहील,
नेत्र बोलके दावील.

गोड चुंबन घ्यायाला — मुख उन्नत करील,
भाव मनींचे सांगेल.

वाटे अंगडें टोपडें — घालुनी त्या हिंडवावें,
कोडकौतुक करावें.

जरी आपुलें कौतुक — झालें नाहीं सानपणीं,
सुख भोगो बाळगुणीं.

आणि बाळसुखासाठीं — मोहमय जीवरथ
ओढायाचा अविश्रांत.

## ४७ उसंत

( ओवी )

कुठें मला उसंत ग, पडे कामाचा डोंगर,
सदा लक्ष ठेवायाचें बाळ रांगे घरभर.
कुठें मला उसंत ग, नाहूं माखूं घालायाचें,
बाळ सानुलें छकुलें पाळण्यांत झोपायाचें.
कुठें मला उसंत ग, भात-तांबलें ठेवूं दे,
बाळ भुकेले असेल दोन घास भरवूं दे.
कुठें मला उसंत ग, नवे शिवूं दे कपडे,
सणासाठीं उद्या हवें नवें अंगडें टोपडें.
कुठें मला उसंत ग, पाखरांची किलबील,
ऐकतांना भुर्रकन जाई निघूनिया वेळ.
कुठें मला उसंत ग, आणिलें ग बाळासाठीं
नवें चांदीचें गोकर्ण, चांदीची ग दूधवाटी.
कुठें मला उसंत ग, आतां घरीं ते यायाचे,
आणि घेऊनिया बाळा जरा बाहेर जायाचें.
कुठें मला उसंत ग, दिन वाटतो लहान,
काम कांहींच होईना, वेळेचें न राही भान.

## ४८ माझी बाळ

(ओवी)

बालरवी उगवला,
पारिजातक फुलला,
बाळ आतां उठायाला,
वेळ झाली ॥ १ ॥

माझी बाळ हासते ग,
किती लाल लाल ओठ,
पारिजातकाचे देठ,
भासतात. ॥ २ ॥

पारिजातकाचीं फुलें,
भूमातेच्या अंकावरी,
माझी बाळ मांडीवरी
खेळताहे. ॥ ३ ॥

पारिजातकाच्या पानीं,
जलबिंदू चकाकती
बाळीची ग दंतपंक्ति
तशी वाटे. ॥ ४ ॥

पारिजातकावरी ग,
पाखरांची किलबिल,
त्याहूनही गोड बोल
बाळ बोले ॥ ५ ॥

पारिजातकाच्या कळ्या
वाहे वारा डोलतात
डूल डोलती कानांत
बाळीच्या ग. ॥ ६ ॥

पारिजातशिरावरी
  किती धुकें पसरलें,
    बाळमुखीं विखुरले,
      केश काळे.   ॥ ७ ॥

पारिजातपानांआड
  कळी लपून राहिली
    पदराच्या आड बाळी
      घेतली मी.   ॥ ८ ॥

## ४९ भावी स्नुषेप्रत

आसावरी–त्रिताल.

ये शोभा नविन शशाङ्का.
दोघांचें गे रूपहि उज्वल,
स्वभाव शीतल, विचार निर्मळ,
दोघे दोघांना अनुकूल
तो शशाङ्क तू गे राका ॥ १ ॥

योग्य दाखवा आदर वृद्धा,
उभयीं ठेवा निश्चल श्रद्धा,
अग्नीमाजीं जळुन विशुद्धा,
हो प्रीति स्वर्णशलाका ॥ २ ॥

मतभेदाचे प्रसंग येतां,
मिटवुन घ्यावे वाद न करतां,
परस्पराशीं जुळवुन घेतां,
गृह बनेल सुंदर अलका. ॥ ३ ॥

स्वभाव त्याचा आहे कोमल,
संकट येतां होतो व्याकुळ,
करी संगरा त्या अनुकूल,
कर दूर तदीय कलंका ॥ ४ ॥

वाट जगाची सरळी नाहीं,
खांचा खळगे ठायीं ठायीं,
चालायाची करा न घाई,
गे जपुन पाउलें टाका. ॥ ५ ॥

सुखांत बघुनी तव संसार,
डोळे झांकिन खुशाल नंतर,
जगावयाची आशा तोंवर,
हें ज्ञात असे न तुला कां ? ॥ ६ ॥

## ५० मुलीचें मन

( सुनीत )

वाटाघाट करावयास जमले आप्तेष्ट मातापिता,
कांहीं सभ्य गृहस्थ नी वरपिता, नाना सुहृन्मंडळी;
ऐकाया भवितव्य यौवनवती चोरून राहे उभी,
होतीं उत्सुक लोचनें धडधडे आशेवरी अंतर.
" कन्येचें कुलशील थोर ! " " दिसतें सौंदर्य हें आगळें, "
" हें तीचें विणकाम, कौतुक तिला वाटे कलांचें बहू, "
" वर्षानंतर या सरेल सगळी शालेय विद्या तिची, "
" आहे पोर गुणी, सुरेख तुमचा संसार मांडील ही. "
ते हे गौरवपूर्ण शब्द श्रवुनी आशा तिची पालवे,
अंतश्चक्षुसमोर नाचत उभीं चित्रें भविष्यांतलीं.
" आम्हांला पदरांत घ्याल ? " विनयें माता वधूची वदे;
सर्वांचें मग लक्ष एकवटुनी प्रश्नाकडे लागलें.
सारें तें जमलें, परंतु न जुळे मानापमानामुळें;
कन्या-कोमल-चित्त आजवरती नाहीं कुणीं जाणलें.

# ५१ नवमहिला

( सुमुदितवदना )

ही नव माहिला हिची थोरवी वर्णिल कोण कवी ?
नव्या युगाचा हवा नवा कवि, हवा नवा भारवी-
हिला मानिलें ' भीरू, अबला, हरिणाक्षी, चंचला ',
सत्य नव्हे हें सत्याभासच रम्याद्भुत दाविला
स्तुती नव्हे ही, व्याजस्तुति ही शर्करावगुंठिता,
मोह पाडुनी हिला अर्पिली बरवी परतंत्रता,
सुंदरतेचा, कोमलतेचा मोह हिला वाटुनी,
वृक्षाभंवती लतेसारखी राही अवलंबुनी,
राही अवलंबुनी आजवर, आज न ती राहिली,
निजसत्वाची जाणिव होउन जागृत ती जाहली.
अबला झाली बलशाली ही, भीरू होइ निर्भया,
रणास निघतां हरिणाक्षी ही भासे मृत्युंजया.
कृतनिश्चय ही सदा भासते, कसें म्हणूं चंचल ?
चंचल नाहीं हृदय तियेचें, चंचल तत्कुंतल.
ही नव महिला वीरमती जणु आज पुन्हा जन्मली,
महिलामहिलांतून तियेची मूर्ती संचारली ?
हिच्या अनुनया गृहवीरांनो, नका रचूं गज्जलें,
केवळ साहसवीरा दाविल श्री अपुलीं पाउलें.
संपत्तीनें मिळे भामिनी, वेड्या लक्ष्मीधरा ?
पराक्रमाची आवड तिजला, निघे सर्वे संगरा,
स्वतंत्र-भारत-भूषण भासे ही माहिला नूतन,
तिला आदरें नव्या कवीनें केलें अभिवादन.

# ५२ समाप्ति

सुनीत

अग्नी लावियला, चिता धडकली; ज्वाला नभा भेटती,
कष्टी प्राण कुडींतले इथुनिया स्वर्गाकडे चालले,
नाहीं सौख्य जगावरी, परि इथें प्राणी वृथा शोधती,
हें जाणून अमोल जीवन तिनें लोकार्थ कीं वेंचलें.
माता प्रेमळ आणि प्रेमळ पिता तैशीच बंधुस्वसा
यांच्यासाठि तिनें तनू झिजवली, यांच्या सुखाकारणीं
रातंदीस झटे, स्वतांस विसरे, आशा नसे जीवनीं:
माया ही अपुरी जगांत पडतां राहील प्राणी कसा ?
सारे लोक मनांत आपपरतां ठेवूनिया वागती,
होतां ही अवहेलना तिज मिळे चित्ता समाधान ना
कोणी प्रेमळ चार शब्द तिजशीं केव्हांहि ना बोलती,
गेलें अंतर हें जळून अवघें आधींच अग्नीविना
मृत्यूनंतर आप्त शोक सरला बारा दिसांनीं पुढें,
काळाच्या उदरीं अनेक बुडले, तैशीच तीही बुडे.

## ५३ पुढें

फेकला हा वारू भरधाव,
पुढेंच जाणें, कधीं न बघणें मागें, हाच स्वभाव ॥ ध्रु० ॥

अंतर किति खडकाळ तोडलें,
माथ्यावरती ऊन साहिलें,
संगें नाहीं कोणी आलें,
परंतु जाणें संतत पुढती, पुढेंच घेणें धाव ॥ १ ॥

किती भागलों, ठेंचकाळलों,
मार्गी किति विमनस्क जाहलों,
अशान्तही मी पुढं चाललों,
माझ्या पुढती अथांग सागर, पैलतिरावर नाव ॥ २ ॥

ध्येया, तव मी विश्वासावर
पुढे चाललों तोडित अंतर,
असेंच दे तूं धैर्य निरंतर,
तुझेच गायिन सदा पवाडे फिरतां गांवोगांव ॥ ३ ॥

असेच पुढती प्रहार झेलिन,
असेच पुढती कटुवच साहिन,
ध्येयामागें धाविन वणवण,
प्रभो, धैर्य दे धैर्याविण ना लागे येथ टिकाव ॥ ४ ॥

कांहीं तरि नित भलें करावें,
समाधान नित मना मिळावें,
मी-पण तेथें नित विसरावें,
कशास चिन्ता होइल, जाइल, राहिल मागें नांव ॥५॥

पादाकुलक

किसान, अपुलें गा तूं गाणें,
खड्या सुराची दे ललकारी,
जीवन अमुचें नित्य नाचतें
गीतावरती तव श्रुतिहारी.
गीत नव्हे हें, श्रमयज्ञाची
गात असे तूं ऋचा शुभंकर,
यज्ञभूतुनी धनधान्याचे
जगकल्याणा फुटतिल अंकुर.
घर्मबिंदुंतुन फुटावयाचे
धनधान्याचे मौक्तिक बिंदु,
अंकुरलेलीं शेतें दिसतां
उसळुन येइल जीवन-सिंधू.
नांगर घालुन सरा चाललें
तुझें आक्रमण भूमीवरती
मांडलिकासम नजराण्यासह
तुज समोरी येई धरती.
तुझ्या नांगरावरी आमुचें
नांगरलेलें जीवन-तारुं
तुझ्याच हातीं लगाम ज्याचे
असा आमुचा जीवनवारु
तुझ्यामुळें कीं भारतभूला
सस्यश्यामला लाभे कीर्ति
नांगरराजा प्रजा नागरी
तुला गातसे चारणगीतिं
कणाकणांतुन धान्यसंपदा
परिश्रमानें तुवा काढली,
पदापदांतुन तव गीताच्या
आम्हां कविंना स्फूर्ति लाभली.

# ५५ लोकापवाद

देवप्रिया

लोकवंशानें जळाली स्फूर्त प्रीती-भावना
जीविताशेच्या स्मशानीं कालवह्नी पेटला !
स्वच्छ स्वच्छंदें वहातां शुद्ध कालिंदी-जळ,
कालियाच्या कालकूटें डोह तेथें माजला.
पौर्णिमेचा चंद्रमा हा खेळता तारांगणीं,
भोवतीं अंधार माजे राहुनें तो ग्रासला.
साजरा पूर्व-क्षितीजीं उंच राहे जो गिरी,
रम्य राई ध्वस्त झाली भूमिकंपें भंगला.
क्षुब्ध झंझावात येतां भेदुनी आकाश हें
उत्तरेला कीं तुटे तारा ध्रुवाची निश्चला.
ना कुणा लोकापवादें सोडिलें, पृथ्वीसुता
मार्ग शुद्धीचा सुशीला जानकीनें सेविला.
अमृताचें वीष होई दुर्जनांनीं बोलतां,
मानवें पेला सुखाचा जों न ओठीं लावला.

( रणरंग )

चल पुढें सारखा पुढें
ऐक मग विजयाचे चौघडे ॥ ध्रु० ॥

खिंडी, ओढे, जंगल, राई,
वाळवंट ही तुडवी पायीं
दुर्गम लंघी कडे. १

धूळ माजली मैलोंगणती,
नेत्र तळावे, सलते रेती,
गणी न हें सांकडें. २

जरा करी ना कधीं ढिलाई,
जरी शिदोरी उरली नाहीं,
न वा जलाचे घडे. ३

अग्नीगोळे भुईंत पुरती,
जपून चाले तेव्हां पुढती,
गीत गात रांगडें. ४

कधीं अचानक मागें पुढती,
रणगाड्यांची होता दाटी
समरीं व्हावें खडे. ५

हातघाइची करी लढाई
मारुन दुष्मन ठाईं ठाईं
फेक तयांचीं धडें. ६

अग्नीगोळे वायु विषारी,
रडे भयानक कर्कश भेरी,
भयाण हें चहुंकडे. ७

परी तुझा ना धीर ढळूं दे,
पुढचें पाउल पुढें पडूं दे,
शौर्य तुझें चोखडें. ८

आक्रमकांचें कर निर्दालन,
उन्मार्गींना सांगे गर्जुन
मानव्याचे धडे. ९

सपुत्र ऐसा जिला लाभला
होइल भूमी मुक्तशृंखला,
भाग्य तिचें केवढें ! १०

## ५७ भारत देश

( भूप त्रिताल )

जय जय जय जय भारतदेश !
मुगुट हिमाचा तुझ्या शिरावर,
तव प्रक्षाळी चरणें सागर,
गंगा खेळे तव स्कंधावर,
रे जगांत तूंच विशेष ॥ १ ॥

नाना भाषा, नाना लोक,
परी संस्कृती त्यांची एक,
प्रांतामाजी बसुनि अनेक
मन एकच, नाना वेष ॥ २ ॥

जन्मभूमि तूं, पुण्यभूमि तूं,
पूर्वज दत्ता वतनभूमि तूं,
भारतपुत्रां कर्मभूमि तूं,
रे रम्य विशाळ प्रदेश ॥ ३ ॥

तुझी संस्कृती किती पुरातन !
तुवा स्थापिला धर्म सनातन
विकासित करुनी स्वतंत्र जीवन
नव जगास दे संदेश ॥ ४ ॥

# ५८ देवी–स्वतंत्रते

( भुवनसुंदर )

देवी स्वतंत्रते देवी, तुला हा शाहीरी मुजरा
आमुच्या तव भेटीसाठीं खिळुनि राहियल्या नजरा.
निमाली दास्याची रजनी रवी ये भाग्याचा उदया
तयाची विहंग गातात गीतिका वाजवुनी सनया.
युगाचें नवीन तेज भरे धवलल्या अनंत गगनांत
युगाचें नवीन गीत भरे मनोजव अधीर पवनांत
युगाचे नवीन रोमांच उमटले नत दुर्वांवरती.
युगाची नवीन भावोर्मि तरंगे तरंगिणीवरती
आजला स्वतंत्रता देवी आपुल्या माहेरा येई
आजला तिच्या दर्शनानें मनाला समाधान होई
देवी स्वतंत्रते देवी तुझे ते आवडते वीर
शोधिण्या तुलाच गेले ना घेउनी तळहातीं शीर ?
तयांचा नेता नेताजी आमुचा सुभाष झुंजार
तयाचा महिमा शौर्याचा सागरासम अपरंपार—
आजला सांग कुठें आहे तन्मणी तव कठांतील ?
कसें हें रुचे तुला येणें सांडुनी पाठविलें मूळ ?
असे जे कितीक गे गेले तयांची वाटुनिया खंत
तुझ्या या स्वागतसमयाला दाटुनी गहिंवरला कंठ.

## ५९ विजयश्री

दोहा

संपुन गेला केव्हांचा अपूर्व रणसंग्राम,
कठोर शस्त्रांना लाभे कांहींसा विश्राम.
धगधगत्या त्या तोफांचे थंड जाहले गोळे,
भरल्या गेल्या बंदुकिंचे बार न ऐकूं आले.
खंदकांतुनी सैन्यानें उंच करूनी मान
पाहियलें वर आकाशीं नव्हतें शत्रु-विमान,
सामसूमही शांतीची, झाली युद्धसमाप्ति—
किल्ल्यावरती शुभ्रध्वजा आतां फडकत होती. १

सेनानीचा सकलांच्या कानीं ये संदेश—
" करावयाचा उद्यां असे नगरामाजि प्रवेश. "
मिरवत जाई सेनानी अश्वावरती ताठ,
काय तयाचा वर्णावा विजयश्रीचा थाट !
मागेंपुढती फौज असे झेलाया आदेश,
विजयदिनाला आज असे त्याचा मान विशेष.
विजयश्रीच्या ललकारी, दुमदुमलें आकाश,
सेनानीच्या नांवाचा दुमदुमला जयघोष. २

पाउस पडला पत्रांचा तारांचा वर्षाव;
व्याख्यात्यांचीं स्तुतिसुमनें, त्यांना तोच सराव.
व्यासपीठ तें उंच असे, तेथ उभा सेनानी
कंठ तयाचा शोभतसे शोभिवंत हारांनीं.
प्रेक्षक होते भंवतालीं, होती फौज समोर
टाळ्यांच्या गजरांत पुन्हां चाले जयजयकार.
समरपटु हा सेनानी भूषण भारतभूचें
सत्वर आली जयमाला, अपूर्व शौर्य तयाचें. ३

दूर बैसला सैनिक तो पहात होता शांत
जयजयकारें झालें कीं त्याचें चित्त अशान्त.
मनांत बदला, " कोणाचा ? कशास हा सत्कार ?
जनता झाली कां वेडी भोळी शून्यविचार !
रणांत लढलों आम्ही ते लावुन प्राण् पणास,
क्षणाक्षणाला प्राणांची नव्हती आम्हां आस.
आम्हीं तांडव मृत्यूचें पाहियलें भेसूर,
आणिक मागें सेनानी दहा योजनें दूर. " ४

आणि तिथें तो सेनानी बोलूं लागे शूर,
आणि मुखांतुन वाहतसे कृतज्ञतेचा पूरः
" मला लाभली दैवानें विजयश्रीची माला,
परंतु नाहीं ही माझी, याचें श्रेय तुम्हांला.
माझा नोहे तुमचा हा चाले जयजयकार,
तुमच्यासाठीं करितों मी हारांचा स्वीकार.
स्वतंत्र भारतभूमीचे आपण सैनिक सारे,
शौर्य चोखटें पाहुनिया परते रिपु परभारें ! " ५

उसळुन बोले सैनिक तो, " आम्ही सैनिक सारे,
तूंच आमुचा सेनानी प्रांजळ चित्त तुझें रे.
मृत्युच्या खाईंत उडी घेऊं आम्हि खुशाल,
देशिल आज्ञा चतुरपणें, निश्चय बालंबाल.
आम्ही आज्ञा तव साऱ्या बोटावरती झेलूं
प्रहार शत्रूंचे क्रूर छातीवरती झेलूं
हिमालयासम उंच करूं परंतु भारत-मान
भारतभूमीचे आम्ही हा अमुचा अभिमान. " ६

## ६० संक्रान्तीस

( खंडिता )

संक्रान्त, घरा निभ्रान्त येइ शुभ पायीं,
ही असो तुझी नवलाई. ध्रु०

नशिबांत जया वनवास, बांधिलें तया कां घरटें ?
बेचिराग हो घरदार, का दिवा त्या तिथें भेटे ?
भोंवला जयांना शाप, तया उःशाप द्यावया येई. १

लाचार कामसू दास, घरिं ज्यांच्या संतत होळीः
खपतात गाळुनी घाम, परि त्यांचें पोट भकाळी,
तूं गोड सुखाचा घास मुलाबाळास घेउनी जाई. २

हा सुंदर छान बगीचा आमुचाच श्रीनगराचा
हे टोळ पिसाट बनूनी, मांडती नाश कुसुमांचा !
हासेल पुन्हा जोमांत पानपानांत काय वनराई ? ३

मंगला सस्यश्यामला ही भूमी एकेकाळीं,
का किमया शेतकऱ्यांची पारखी अचानक झाली ?
भरदार पिकाविं शेतें, भाग्य यापरतें कोण्तें नाहीं. ४

हा अखंड युद्धकटाह विश्वाच्या उदरीं पेटे,
ही प्रचंड डोंब कहाली आमुच्या उरीं धगधगते !
तूं आण शांतिचें नीर, द्यावया धीर शांतवनदायी. ५

व्याकूळ जाहला प्राण, हें मुक्या मनाचें गाणें-
शारदा रुष्ट हृदयांत, ना सुचती वैभवगानें,
हें जीवन चिंताक्रांत, सदाचें भ्रांत, भारसें होई. ६

## ६१ नौखाली

( परिलीना )

नौखाली नौखाली दुःखी नौखाली,
सांगत आहे ही गोष्ट आपुली.

गांवाला वेशीला लागली आग,
घराला आग नी दाराला आग,
जळतीं छपरें, जळतीं शेतें,
आग या येथें नी आग त्या तेथें.
अंबरीं दाटला धूर,
दृश्य न बघवें क्रूर.
पाहातां नेत्रांना भोंवळ आली,
सांगते नौखाली गोष्ट आपुली. १

लोकांना गांठून हे बेसावध
घरांत शिरती कराया वध,
लागले घरांस, दारांस चुडे,
सौभाग्यवतींचे वाढले चुडे.
आकाशीं भिडे किंकाळी,
रात्रीला, सांज सकाळीं,
उसासे, आंसवें, रडें भोंताली
सांगते नौखाली गोष्ट आपुली. २

…दिरें मोडलीं, बुडाला धर्म,
…णास सांगावें आपुलें कर्म ?
…टलों सक्तीनें सक्त नमाज,
काय हें कपाळीं लिहिलें आज ?
लुटलीं घरें नी दारें,
लटलीं बायकापोरें,
अम्मानी सुल्तानी मशिवीं आली;
सांगते नौखाली गोष्ट आपुली. ३

आम्हां आंचवल्या आई बहिणी,
तयांची हांक न ऐकली कोणी.
मिरविलें त्यांनीं संगिनीवर
कालच जन्मल्या बाळाचें शिर.
घराचें स्मशान झालें,
जीवन भ्रष्ट जहालें,
आकान्त माजला ह्या वर खालीं,
सांगते नौखाली गोष्ट आपुली. ४

माउलींना आधीं या सोडवाया,
परत घरांत धर्मात घ्याया,
भुकेल्या पोटास द्यावी भाकरी,
माथा टेकायास द्यावी ओसरी,
धर्मास ग्लानी कीं आली,
अग्रणी ऐकूं न आली,
धर्मसंस्थापक कोठें तो वाली ?
सांगते नौखाली गोष्ट आपुली. ५

जाति भुवनसुंदर

चालली वनास अनवाणी
जानकी रामाची राणी
प्रेमळ बांधव दूर लोटले,
साम्राज्ञीपद आतां कुठलें ?
विभवाला मन आतां विटलें;
उरेना आवड आभरणीं
चालली रामाची राणी. १
अलंकार निज क्षणां उतरले,
कोमल देहीं रुक्ष वल्कलें
लेवुन वदनीं हास्य नटविलें;
आंसवें दिसलीं ना नयनीं
चालली रामाची राणी. २
'असो नसो वा घरांत वैभव,
होवो जावो जनांत गौरव,
शांति मनाची ढळली ना लव,'
दिली ही शिकवण जनकांनीं
चालली रामाची राणी. ३
आजवरीची सुखावलेली,
कोमलगात्रा राजसबाळी,
वनवासाचें दुःख कपाळीं,
कशी ही दैवाची करणी,
चालली रामाची राणी. ४
उत्सुक जनता अभिषेकाला,
तोंच निघाली वनवासाला,
विषमय झाला अमृत पेला,
आजला प्रजा दिनवाणी,
चालली रामाची राणी. ५
छायेसम जानकी निघाली,
हृष्ट मनानें, श्रान्त पाउलीं,
त्याच पाउलीं तिनें दाविलीं
प्रीतिचीं स्थिर कोरिव लेणीं
चालली रामाची राणी. ६

# ६३ सीतामंगल

अक्षरछंद

वाजंत्री वाजवा बाई, चौघडे वाजवा;
विवाहाचा सोहळा हा, सीताबाळ सजवा
शिवधनुर्भंग करी,
राम भास देवापरी,
रूप शौर्य अशापरी लाभे काय मानवा.
लवे लोचनाचें पातें,
तोंच शिवधनु तुटें;
कौशिकाला धन्य वाटें, स्वयें म्हणे वाहवा.
धन्य झालें रविकुळ,
धन्य वसुंधरा बाळ,
पूर्व सुकृतें मंगल साधे योग बरवा.
कुठें सीता सुकुमार.
पुजे कोठें गौरीहर,
घडी भरली, सत्वर वेदीवर बोलवा.
अंतर्पाट करा दुरी.
सीता भेटवा लाजरी,
रामराया वधूलागी ध्रुवतारा दाखवा.

कोकिळा

बिभीषणा, ही तुझी तुला घे सोन्याची लंका
नव्हती माझी, जरी जिंकली,
तुजला प्रेमें पुन्हां अर्पिली,
लोभासाठीं नाहीं आलों, नको वृथा शंका.

जुलूम होता दशाननाचा,
दूर करावा हेतु मनाचा,
जगामधें सर्वत्र घुमावा न्यायाचा डंका.

भुलावुनी ने सीता रावण,
पराक्रमाला लागे लांछन,
सदा असावी जीवनसरणी जनांत अकलंका.

दीनासाठीं खड्ग धरावें,
सत्यासाठीं मरण वरावें,
आम्हां नाहीं ठावें, समरीं ध्यावें आतंका,

करी प्रजेवर प्रेम निरंतर,
प्रजा तुला ना देइल अंतर,
प्रेम दावितां बाळ बिलगतें मातेच्या अंका.

## ६५ महात्मा

६३

( पादाकुलक )

गेला कुठला पुण्य महात्मा, अमुच्या हृदयीं शाश्वत ठेला,
अमुच्या पाउलवाटेवरती दिव्यत्वाचा प्रकाश भरला.
गीत संपलें तरी अजूनी हृदयंगम तो स्वर रेंगाळे,
त्या गीताच्या स्वरमेळानें जीवन अमुचें पुलकित झालें.
नक्षत्रांनीं नभ उजळावें, गेह उजळती दीपकपंक्ति
स्नेहरसानें तुझिया अमुच्या पहा उजळल्या जीवनज्योति.
धगधगणाऱ्या युद्धकटाहीं विश्वगोल तो तापुन गेला,
तुझ्यासवें कीं शांतिरसाचा तप्तभूवरी पाउस आला.
शक्ति पाशवी पशूप्रमाणें अंगावरती धावुन आली,
शस्त्रापुढती दुर्बल मूर्ति न डगमगता उभी राहिली,
मानव्याचा पोत पाजळे, जळली पशुता, जळे मलिनता,
उद्धतशक्ती शरण येउनी दावी चरणावरी लीनता.
जीविताच्या यज्ञामाजीं सहर्ष दिधली तूं आत्माहुति
गमे जगाच्या कल्याणास्तव तुझ्यासारख्या संतविभूति,
तुझ्या विभूतीमाजीं आम्हां विभूतिदर्शन भेटायाचें,
तुझिया स्मरणें श्रेयस प्रेयस भ्रान्त जनांना लाभायाचें